या नाटकाचा पहिला प्रयोग शुक्रवार ता. १५ फेब्रुवारी १९३५ रोजीं रात्रौ बालमोहन नाटक मंडळीनें पुणें येथील बादशाही विजयानंद नाटकगृहांत करून दाखविला.





## : पात्रें :

[ प्रवेशाच्या अनुक्रमानें ]

**कचेश्वर**

**विद्यागौरी**

**निरंजन**

**किशा**

**नागनाथ**

**नेत्रा**

**नीरा**

**भुलेश्वर**

**चित्रा**

**अरविंद**

**चांडिराम**

या शिवाय आणखी इतर

**अंक १ :** कचेश्वराचा वाडा. सकाळीं नऊ साडेनऊचा सुमार.

**अंक २ :** १. स्टेशनजवळचा रस्ता. दिवस तोच. साडेबाराचा सुमार.

२. कचेश्वराचें घर. दिवस तोच. पाऊणचा सुमार.

३. एक घर. एकाचा सुमार.

**अंक ३ :** १. कचेश्वराच्या वाड्यापुढचें फाटक. त्याच दिवशीं रात्रीं दहा वाजतां.

२. रस्ता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं.

३. कचेश्वराचें घर. त्याच दिवशीं दुपारीं.

**अंक ४ :** १. कचेश्वराचें घर. दोनतीन दिवसानंतर.

२. गांवाबाहेरची एक जागा. तोच दिवस.

३. कचेश्वराचें घर. त्याच दिवशीं थोड्या वेळानें.

**नाटकांतील घटना व वस्तुस्थिती निव्वळ काल्पनिक आहे.**

# प्रथमच

सांगावयाचें तें असें कीं प्रस्तुतचें हें नाटक सत्यसृष्टींतलें नसून निव्वळ काल्पनिक आहे. सत्याचा अभाव उत्पन्न करणाऱ्या कांहीं गोष्टी व उल्लेख यांत आले असले तरी एकंदर सर्वच परिस्थिति, घटना व प्रसंग केवळ कल्पनेच्या जगांतच आढळतील असे आहेत. तरी वस्तुस्थितीच्या निष्कर्षावर हें नाटक घांसून पहाण्याचा विदूषकी उद्योग निष्कारण कोणीही करूं नये. पाश्चात्य वाङ्मयांत Burlesque किंवा Farcical Comedy ज्याला संबोधण्यांत येतें असें हें प्रहसनात्मक स्वरूपाचें नाटक आहे. अशा नाटकांचें अतिशयोक्तिपूर्ण विनोदावरच अधिष्ठान असतें. कवींना जो निरंकुशत्वाचा परवाना असतो तो अशा तऱ्हेचीं नाटकें लिहितांना नाटककारानें कांहीं अंशीं मिळवणें अवश्य असतें; नाहीं तर वेषांतराच्या किंवा छद्मी कपटाच्या आधारावर उभा केलेला अद्भुत घटनांचा इमला पत्त्यांच्या बंगल्यासारखा सहज उडून जावयाचा. अर्थात् अशक्यतेच्या पराकोटीपर्यंत अतिशयोक्तीची मजल नेऊन विनोद निष्पत्ति होणें शक्य नसतें हें या निरंकुशत्वावर एक बंधन असतेंच. या नाटकांतील पात्रें हीं खऱ्याखुऱ्या व्यक्तींचीं स्वभावचित्रें नसून त्यांचीं व्यंग चित्रें आहेत. ज्या भावनेचा किंवा विचारांचा कथानकाच्या प्रवाहावर किंवा गतीवर गंभीर परिणाम होऊं शकेल अशा विचारांना व भावनांना या तऱ्हेच्या नाटकांत थारा देऊन चालत नाहीं. प्रस्तुत नाटक लिहितांना सुप्रसिद्ध फ्रेंच नाटककार मोलिअर याच्या लेखनतंत्राचा मीं बराच उपयोग केलेला आहे. त्याचप्रमाणें चंडिराम ही भूमिका निर्माण करतांना मीं त्याच्याच एका सुप्रसिद्ध भूमिकेचा आधार घेतलेला आहे. मात्र हें ऋण कांहीं थोड्या कल्पनांच्या व घटनांच्या पुरतेंच आहे. बाकीचा सर्व कथाभाग स्वतंत्र आहे.

'साष्टांग नमस्कार' नाटकांतील वाङ्मयात्मक स्वरूपाच्या विनोदापेक्षां प्रस्तुत नाटकांतील विनोद भिन्न स्वरूपाचा आहे. तो सामान्य प्रेक्षकांनाही कळेल अशाच अपेक्षेनें योजिलेला आहे.

सदर नाटक अत्यंत थोडा वेळ असतांनाही मोठ्या हौसेनें व उत्साहानें बसविल्याबद्दल बालमोहन नाटक मंडळीचे मालक श्री. दामोदर रामचंद्र जोशी यांचा व त्यांच्या मंडळींतील नटांचा मी आभारी आहें.

या नाटकांतील 'उपास मज लागला' ही सुंदर विनोदी कविता कु. मालती किर्लोस्कर, बी. ए., हिनें रचलेली आहे. 'घराबाहेर' पडल्यानंतर इतक्या लवकर रसिक प्रेक्षकांच्या भेटीला येण्याचा हा अपूर्व योग केवळ त्यांच्याच मजवरील अनिर्वचनीय प्रेमामुळें येत आहे.

११ फेब्रुवारी १९३५
कर्नाटक हाऊस, **मुंबई**

**प्रल्हाद केशव अत्रे**

●

## दुसरी आवृत्ति

तेरा वर्षांनीं या नाटकाची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध होते आहे. या काळांत या नाटकाचे महाराष्ट्रांत शेंकडो प्रयोग झालेले आहेत. रंगतीच्या दृष्टीनें हास्यरस निर्माण करणारें एवढें यशस्वी नाटक मराठींत दुसरें नाहीं असें म्हटलें तर त्यांत प्रौढीचा दोष येऊं नये. या नाटकाची मराठी आणि हिंदी चित्रपटीय रूपांतरेंहि रुपेरी पडद्यावर प्रकाशित झालेलीं आहेत.

१३ मार्च १९४८
नवयुग कार्यालय, **मुंबई**

**प्रल्हाद केशव अत्रे**

●

## तिसरी आवृति

मूळ आवृत्तीमधला बराचसा मजकूर ह्या आवृत्तींत कमी केला आहे. ह्या नाटकाचें हिंदी भाषांतर प्रा. सौ. विजया मुळे ह्यांनीं 'मायाबाजार' ह्या नांवानें केलें असून पाटणा येथील नाट्यस्पर्धेत गेल्या वर्षी त्याला पहिलें बाक्षिस मिळालेलें आहे.

१३ एप्रिल १९५४

**प्रल्हाद केशव अत्रे**

---

# भ्रमाचा भोपळा

## १

कचेश्वरांचा वाडा. वाड्याच्या तळमजल्यावरील एक प्रशस्त दालन. पडदा उघडतांच कचेश्वर व त्यांची पत्नी विद्यागौरी समोरील दरवाजांतून रागारागानें बोलत आंत येतात. कचेश्वरांचें वय सुमारें पंचेचाळीस वर्षांचें असून विद्यागौरी ही वीस एकवीस वर्षांची आहे. कचेश्वरांची ती तिसरी पत्नी आहे.

**कचेश्वर :** छे, छे, छे ! तूं आतां अगदीं बोलूंच नकोस ! तें शक्य नाहीं ! मीं जें ठरविलं तें ठरविलं ! त्यामध्यें आतां काडीचाही फरक होणं शक्य नाहीं.

**विद्यागौरी :** अहो, पण मी म्हणतें—

**कचेश्वर :** तूं कांहींही म्हणूं नकोस ! आणि कांहीं सांगूं नकोस !

**विद्यागौरी :** अहो, पण माझं ऐकाल तर खरं—

**कचेश्वर :** बायकांचं मी कांहीं ऐकत नसतों ! जें ठरलं तें ठरलं !

**विद्यागौरी :** काय–ठरलं काय ?

**कचेश्वर :** ठरलं काय ! ठरलं हेंच कीं, या दोन्हीं पोरींचीं लग्नं या महिन्याच्या आंत उडवून टाकायचीं ! छेः, अविवाहित मुली घरांत ठेवण्याची हल्लीं सोयच उरली नाहीं मुळीं ! पैशाची मला इतकी भीति वाटत नाहीं इतकी या पोरींची

भीति वाटते ! पैसा सुरक्षित ठेवण्याच्या जशा बँका निघाल्या आहेत तशा पोरी सहीसलामत ठेवण्याच्या बँका जर निघतील तर आमच्यासारख्या मुलींच्या बापांवर केवढे उपकार होतील !

**विद्यागौरी** : तुम्हींच करा हा असला उद्योग म्हणजे लोकांच्यावर तरी तुमचे उपकार होतील !

**कचेश्वर** : छान ! अविवाहित पोरींची पेढी मीं या वाड्यांत उघडली म्हणजे दोन दिवसांच्या आंतच मला दिवाळं काढावं लागेल ! अग, घरांत असलेल्या लग्नाच्या ह्या दोन हुंड्या पटवतां पटवतां तर मला माझी पत गमाविण्याची पाळी आली आहे.

**विद्यागौरी** : पण मी म्हणतें एवढा हा त्रागा करायला झालंय काय ?

**कचेश्वर** : काय झालंय ! आतां काय व्हायचं राह्यलं आहे ? मागं शाळेला किंवा फिरायला या आपल्या मुली जात असत, तेव्हां रस्त्याच्या कडेनं ताबूत पाहायला आल्याइतकी लोकांची गर्दी जमत असे ! म्हणून शाळाबिळा बंद करून घरांतून बाहेर पडण्याची मीं त्यांना बंदी केली. पण अलिकडे मी पाहतों आहे तो उडाण-टप्पू तरुणांचे रिकामटेकडे तांडे सकाळ संध्याकाळ या वाड्याभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागले आहेत.

**विद्यागौरी** : तुमच्या घराला प्रदक्षिणा घालायला तुमचं घर कांहीं काशीविश्वे-श्वराचं देऊळ लागून राहिलं नाहीं ! समोरच्या मारुतीला लोक आपले येतात ! तुमचं आपलं कांहीं तरी भलतंच !

**कचेश्वर** : आजपर्यंत कुत्रंसुद्धां ढुंकून पाहात नव्हतं या मारुतीकडे आणि आतांच गेल्या महिन्यापासून या मारुतीचा उरूस कां भरायला लागला ! मारुतीचंच दर्शन घ्यायचं तर गांवांतले इतर मारुती काय रामाकडे रवाना झाले आहेत अयोध्येला ! आणि मारुतीच्या दर्शनाला येणारे हे उडाणटप्पू लोक मारुतीकडे पाठी करून आपल्या वाड्याच्या खिडक्यांकडे डोळे लावून कशाला बसतात ?

**विद्यागौरी** : तुमच्या वाड्याचं सौंदर्य बघत असतील. दुसरं काय ?

**कचेश्वर** : तर तर ! आमचा वाडा म्हणजे अगदीं ताजमहाल किंवा गोलघुमटच लागून राहिला आहे कीं नाहीं ! आमच्या वाड्याचं सौंदर्य बघण्यापेक्षां आमच्या वाड्यामधलं सौंदर्य न्याहाळण्यासाठीं ही रोज घरासमोर जत्रा भरत असते

समजलीस! एवढ्याचसाठीं घरांतल्या दरोबस्त खिडक्या मीं बंद करून टाकल्या आहेत! संसारी माणसांच्या घराला खिडक्याजाळयांचा कांहीं एक उपयोग नाहीं! म्हणजे घरांतले लोक बाहेर बघतात आणि बाहेरचे लोक आंत डोकावतात.

**विद्यागौरी** : सोन्यासारख्या घराची अशी अमंगळ अंधारकोठडी बनावलीत! कांहीं वाटतं आहे का मनाला? इतर लोकांना जगांत मुलीबाळी कांहीं आहेत कीं नाहींत? का तुम्हीच तेवढे पोरींचे बाप लागून गेलांत मुलखावेगळे! म्हणे घराचा उंबरठा ओलांडायचा नाहीं कीं खिडकींतून बाहेर डोकावायचं नाहीं! मग पोरींनीं हिंडायचं तरी कुठं? गच्चीवर जाऊन शतपावली करायची का कौलाघरांवर जाऊन हवा खायची?

**कचेश्वर** : गच्चीवर! गच्चीवर तर मुळींच जातां कामा नये त्यांनीं! नाहीं तर एखादा उपद्व्यापी प्राणी विमानांतून तिथं यायचा आणि वरचेवरच त्यांना पसार करायचा!

**विद्यागौरी** : तर तर! माझ्या मुली म्हणजे कांहीं पत्र्यावर वाळत घातलेल्या पापडकुरडया नाहींत! कीं वाटेल त्या कावळ्यानं खुशाल चोंचींत धरून त्यांना वरचेवर पसार करावं!

**कचेश्वर** : तें तूं मला सांगूं नकोस! किती केलंस तरी तूं त्यांची सावत्र आई आहेस! पण मी तर त्यांचा सख्खा बाप आहें ना! आपला हा सणंग काय किंमतीचा आहे हें मला जितकं माहित आहे तितकं तुला ठाऊक आहे का?

**विद्यागौरी** : हें पहा, मी त्यांची सावत्र आई असलें तरी माझ्या मुलींसंबंधीं असलं भलतं सलतं मी तुम्हांला देखील बोलून द्यायची नाहीं!

**कचेश्वर** : असं काय! मग मी तुला असं विचारतों कीं त्या दिवशीं तो भिकारडा अरविंद या घरांत कसा शिरला! बरं, आला तर आला आणि दांत विचकून निलाजरेपणानं मला म्हणतो कसा, 'माझं तुमच्या थोरल्या मुलीवर—नेत्रावर प्रेम आहे.' मी म्हणालों, 'माझ्या सोट्याचं देखील तुझ्या टाळक्यावर फार प्रेम आहे तें दाखवूं का?' त्याबरोबर तो मागच्या पावलींच पसार झाला. तो गेला नाहीं तोंच तो दुसरा गाढव निरंजन आला. तोही तितकाच निलाजरा! म्हणतो काय कीं, 'मला तुमच्या धाकट्या मुलीशीं लग्न करायची इच्छा आहे!' मीं म्हटलं, 'मलाही माझ्या हाताचं तुझ्या गालफडाशीं लग्न लावण्याची इच्छा आहे!' आतां सांग, हे रस्त्यावरचे उपरे लोक आपल्या घरांत बेधडक शिरायला लागले आहेत ते कांहीं या पोरींकडून उत्तेजन मिळाल्याशिवाय? खाजघल्या-

शिवाय का कुठं खरूज येते? एवढ्यासाठीं मला घराचा दरवाजा बंद करून दिंडीशीं भय्या बसवावा लागला!

[ भय्याचा वेष घेतलेला निरंजन टपाल घेऊन येतो.

**कचेश्वर** : दरवाजा छोडकर यहां क्यौं आया, भय्या?

**निरंजन** : टपाल लेकर आया साहब! वो पोस्टमन अंदर आना चाहता था! लेकिन मैंने उसको बाहर हकाल दिया!

**कचेश्वर** : (टपाल बघत) हा बघ पत्रांचा केवढा गठ्ठा आला आहे तो पोस्टां-तून! आपल्या पोरींच्या प्रेमासाठीं तळमळणाऱ्या उमेदवारांचे अर्ज असतील हे सारे! विलायतची डाक आल्यासारखीं येत असतात प्रेमपत्रं हीं रोज अशीं! कांहीं दिवसांनीं मला आपल्या घरांतच एक लहानसं पोस्ट ऑफिस उघडावं लागेल!

**विद्यागौरी** : कावीळ झालेल्या माणसाला सारंच पिवळं दिसतं, तसं आहे तुमचं! साऱ्या मुलखाचे तुम्ही संशयी! तुम्हांला एक देखील सरळ दिसायचं नाहीं! माझ्या नांवाचीं आलेलीं हळदीकुंकवाचीं कार्डं देखील तुम्ही कधीं माझ्या हातीं लागूं देत नाहीं!

**कचेश्वर** : अभीतक तुम यहां क्यों खडा है भय्या? चले जाव दरवाजेपर! नहीं तो कोई आदमी अंदर घुस आयेगा!

**निरंजन** : आप फिकीर मत करिये साब, कोई अंदर नहीं आयेगा!

**कचेश्वर** : नहीं आयेगा काय? परवांचे दिवशीं दुपारीं एक माणूस सरळ आंत शिरला आणि खुशाल आपला वर चालला होता! मीं जिन्यांत अडवला म्हणून बरं झालं! म्हणतो काय मला तो, कीं माझा पतंग अडकलाय वर गच्चीवर! तेव्हां मीं त्याची मानगूट पकडली आणि त्याला वावडीसारखा बाहेर भिरकावून दिला! तूं बसला असशील त्यावेळीं घोरत कुठं तरी! ऐसा गाफिल रहता है तुम्! किसीकू अंदर मत आने दो!

**निरंजन** : अच्छा साब! अगर मेरा बाप का बाप भी घुस आय तो मैं उसे अंदर नहीं आने दूंगा!

[ जातो.

**कचेश्वर** : म्हणून म्हणतों कीं इतका सारा उपद्व्याप करण्यापेक्षां या पोरींच्या लग्नाची खटपट एकदांची नाहिंशी करून टाकली म्हणजे झालं. त्यांतून माझी प्रकृति ही अशी! कधीं काय होईल याचा नेम आहे का?

**विद्यागौरी** : कांहीं झालं नाहीं तुमच्या प्रकृतीला ! अगदीं आहांत तस्से आहांत ! उठल्याबसल्या प्रकृतीचा बाऊ करण्याची तुम्हांला जन्मापासून खोड जडली आहे ! येईल त्याला प्रकृति दाखवायची आणि देईल त्याचं औषध घ्यायचं ! काढे काय न् गोळ्या काय न् भस्मं काय अन् मात्रा काय ? भलभलतीं औषधं खाऊन नसते रोग मात्र अंगाला जडायचे झालं !

**कचेश्वर** : छान, औषधं खाऊन म्हणे रोग जडतात ! हें तर तुझं शहाणपण ! रोज मी एवढीं औषधं घेतों म्हणून तुझं सौभाग्य शाबूत राहिलं आहे समजलीस ! नुसत्या अन्नानं का कुणी जिवंत राहतं ? दोन वेळ जेवणापेक्षां दोन वेळ माणसं औषधं खातील तर जगांत रोग औषधाला देखील शिल्लक राह्यचे नाहींत !

**विद्यागौरी** : पुरें झालं तुमचं ! तुमच्या या काढ्यांनीं, अरिष्टांनीं आणि भस्मांनीं घराला काष्ठौषधीच्या कारखान्याची कळा आली आहे ! जिथं पाहावं तिथं बाटल्या, बरण्या आणि मडकीं ! माझ्या संसाराचा नुसता दवाखाना करून टाकला आहेत तुम्हीं ! सकाळ संध्याकाळ पाहावं तेव्हां आपले नुसते काढे पिताहेत ! आतां आंघोळीलाच तेवढा काढा घ्यायचा राह्यला आहे झालं !

**कचेश्वर** : पुरें झालं ! काढा म्हणजे पृथ्वीवरचं अमृत आहे अमृत ! आज चाळीस वर्षं हा देह नुसत्या काढ्यावरच जगला आहे ! सकाळीं चहा घ्यायच्या ऐवजीं रोज जर तूं कपभर काढा घेशील तर अक्कल तरी येईल तुला थोडीशी !

**विद्यागौरी** : त्या बाबतींत तुम्हांला तरी कांहीं काढ्याचा उपयोग झाल्यासारखा दिसत नाहीं ! अंगाला काढ्याची आणि तोंडाला गुडगुडीची अशी घाण येत आहे तुमच्या, कीं अगदीं जवळ येऊं नये असं वाटतं !

**कचेश्वर** : माझ्याजवळ न येण्याची सबब मात्र छान शोधून काढली आहेस !

**विद्यागौरी** : आणि रात्रीं निजायच्या वेळीं तें करंजेल तेल अंगाला चोपडायचं ! कोण येईल तुमच्याजवळ ?

**कचेश्वर** : माझी प्रकृति काय आहे हें मला ठाऊक आहे ! तुला हंसायला काय होतंय ! आतां कालच पाहा, निजायच्या पूर्वी मीं तें बलभीम चूर्ण घेतलं नाहीं तर सबंध रात्रभर मी खोकत होतों !

**विद्यागौरी** : कांहीं खोकत नव्हतां ! चांगले डाराडूर घोरत पडलां होतां कुंभकर्णासारखे ! तुम्हांला ठाऊक कीं मला ठाऊक ? तुमच्या घोरण्यामुळं मला मात्र रात्रभर डोळ्याला डोळा लागला नाहीं !

**कचेश्वर :** खोकल्याची ढास लागून माझा प्राण गेल्याशिवाय तूं नाहीं कबूल करायचीस ! अरे राम, आलीच ही उबळ !

**विद्यागौरी :** गुडगुडी ओढा आणखी म्हणजे खोकला थांबेल !

**कचेश्वर :** ( खोकतो ) छे, प्राण जायची वेळ आली ! तूं बघतेस काय नुसती शुंभासारखी ! त्या किशाला हांक मार—किशा—ए—किशा—

[ किशा येतो.

किशा, काढवा, अरे आतां माझा प्राण गेला म्हणजे का तूं काढा आणणार आहेस माझ्या प्रेतावर शिंपडायला ? जा—जा—लौकर, काढा घेऊन ये—आणि तें चाटण आणि मधाची बाटली आण ! आणि त्या तांबड्या पेटींतली गोळ्यांची बाटली आणायला विसरूं नकोस ! आणि हें बघ, त्या डॉक्टरला इकडं पाठवून दे ! असा पहातोस काय दगडासारखा ? ते परवांपासून ठेवलेले नवीन डॉक्टर नाहींत का—

**किशा :** हां हां ! म्हणजे ते काळा चष्मा घालून भुतावानी घरामंदी फिरत्याती ते डॉक्टर—

**कचेश्वर :** फाजीलपणा करूं नकोस ! जा, त्यांना बोलावलंय म्हणून सांग ! इतका वेळ काय करीत बसलाय हा डॉक्टर तिकडे कोणास ठाऊक ?

**किशा :** तें बाटलीमंदी धरून ठिवलेलं कसलंसं पानी तपासीत बसल्याती !

[ जातो.

**विद्यागौरी :** दोन दिवस झाले, हा डॉक्टर कोण आणलाय घरांत ? आधींच या औषधापायीं पैशाचा चाललाय चुराडा आणि त्यांत हा डॉक्टर आणखी उरवठ्याचा पुरवठा कशाला ?

**कचेश्वर :** सत्रापंधरा डॉक्टरांचीं बिलं इथंन् तिथं भरण्यापेक्षां एक सबंध डॉक्टरच घरांत ठेवलेला काय वाईट ? तसा कांहीं माझा या विलायती औषधांवर विश्वास नाहीं; पण देशी औषधें पाहिलीं म्हणजे तुम्हां मंडळीचे डोळे पांढरे होतात ना ? म्हणून ठेवलाय याला ! फुकटाला तर कांहीं महाग नाहीं हा डॉक्टर !

**विद्यागौरी :** म्हणजे काय ? पगार घेतल्याशिवाय का राह्यलाय तो !

**कचेश्वर :** पगार ठेवलाय त्याच्या बापानं ! बाहेर माशा मारीत बसला होता त्याला दोन वेळ अन्न तरी खायला मिळेल इथं ! पगार मागायला लागला तर देईन हांकून ! पसंत नाहीं काम म्हणून !

[आंतून भय्या म्हणजे निरंजन कोणाशीं तरी भांडतो आहे असा आवाज येतो.

**निरंजन :** अरे चले जाव ! अंदर नहिं आना ! लेकीन जादा बकवा करेंगा तो तुमारा मूह मैं फोड डालुंगा !

**दुसरा आवाज :** अरे क्यौं, पागल हो तुम् ! मैं तारवाला सरकारी आदमी हुं !

**कचेश्वर :** या भय्यानं काय चालवलाय हा दंगा बाहेर ? अरे ए भय्या, भांडतोस कोणाशीं तिकडे एवढ्या मोठ्यानं !

**विद्यागौरी :** तुमच्या हुकमाची अंमलबजावणी करीत असेल तो, दुसरं काय !

[ निरंजन व तारवाला येतो.

**निरंजन :** अरे देखो साहब, ए आदमी सीधे अंदर घुसता है ! मैं बोलता हुं निकाल जाव बाहर, तो बोलते है के मैं तारवाला हुं.

**कचेश्वर :** चूप बस बेवकूफ ! हा तारवाला आहे, नाहीं तर काय टांगेवाला आहे !

**तारवाला :** साहेब, अर्धा तास विनाकारण खोटी केली या तुमच्या माणसानं ! अगदीं पागल आहे हा इसम ! आणखी शिवीगाळ करतोय उलट !

**निरंजन :** इस्से बूरी गाली देएंगा तुमकू ! साहेब, ये झूटा आदमी है. मैं बोला तार बताव तो हमकू एक खालीं कागद बताता है ! तार ऐसी रहती है ?

**कचेश्वर :** चल जा बाहेर आपल्या कामाला !

[ भय्या वेडेंवांकडें तोंड करीत जातो.

कोणाची तार आली आहे ही ! ( कचेश्वर तारेच्या पुस्तकांत सही करून तार घेतो. तारवाला निघून जातो. तार वाचून आनंदानें ) काय ? बाराच्या गाडीनं येणार आत्तां ? फारच छान ! अरे किशा ! ए किशा ! किशा !

**विद्यागौरी :** कोणाची आली आहे तार एवढी ?

**कचेश्वर :** कुठं मेला हा किशा ! आयत्या वेळीं एक गडी जागेवर सांपडेल तर शपथ ! मला तार आली तशी याला तार आली आहे कीं काय कुणास ठाऊक !

[ किशा येतो.

किशा ! अरे त्या नागनाथाला हांक मार इकडे ! जा लवकर—अरे नको, तो नागनाथच इकडे आला !

[ किशा जातो आणि नागनाथ येतो.

**विद्यागौरी :** पण मी म्हणतें तार कुणाची आली आहे एवढी ?

**कचेश्वर :** नागनाथ, बाराच्या गाडीला स्टेशनावर जा आपली शिग्राम घेऊन ! जाफराबादचे जाहागिरदार येणार आहेत आपल्याकडे. फार बडे गृहस्थ आहेत ते,

समजलास ! मीच येणार होतों स्टेशनावर त्यांना आणायला; पण तोंपर्यंत माझं हें सारं आह्निक उरकायचं नाहीं ! त्यांचं नीट आगत–स्वागत करून त्यांना इथं घेऊन ये ! छान बरदास्त ठेव त्यांची !

**नागनाथ** : ठीक आहे.

**विद्यागौरी** : हे कोण जाफराबादचे जहागिरदार ?

**कचेश्वर** : आणि हें पाहा नागनाथ ! दरवाज्यावरच्या माडीवर किशाला बैठक टाकायला सांग आणि खुर्च्याही मांडायला सांग. हें पाहा पाहुण्याचं सामान काय आलं असेल तें पलिकडच्या सोप्यांत ठेवा. जा !

[ नागनाथ जातो.

**विद्यागौरी** : मीं काय विचारलं तें ऐकूं आलं नाहीं वाटतं ? म्हटलं हे जाफराबादचे जहागिरदार कोण काढले आहेत ? आणि आपल्याकडे कशाला येणार आहेत हे पाहुणे ?

**कचेश्वर** : जाफराबादचे जहागिरदार कोण ! आणि आपल्याकडे कशाला येणार आहेत ? ओळख पाहूं कशाला येणार आहेत ते ! बाकी तुला काय ओळखतां येणार आहे दगड ! सांगतोंच तुला सारं. म्हटलं पुढल्या आठवड्यांत ते आपले जांवई होणार आहेत जांवई ! आपल्या नेत्राचं नशीब थोर म्हणून तिला असला नवरा मिळाला. मग मघाशीं मी तुला काय सांगत होतों ?

**विद्यागौरी** : काय वेड तर लागलं नाही तुम्हांला ! कुठला कोण मसणांतला जहागिरदार काढला आहे आणि तो म्हणे आपला जांवई होणार आहे ! नांव देखील ऐकलं नाहीं कधीं कीं तोंडसुद्धां पाह्यलं नाहीं त्या माणसांचं ! तुम्हीं तरी पाहिला आहे का त्याला ?

**कचेश्वर** : मीं त्याला पाहिलं नाहीं आणि मला त्यांना पाहण्याची जरूरीही पण नाहीं ! डोळे मिटून खुशाल पोरगी पदरांत टाकावी असलं हें स्थळ आहे ! एकदां लग्न लागलं म्हणजे पुष्कळ प्रसंग येतील त्यांना पाहण्याचे !

**विद्यागौरी** : हें पहा, मी तुम्हांला साफ सांगतें, तुम्ही या भानगडींत पडूं नका; मी हें लग्न होऊं देणार नाहीं !

**कचेश्वर** : आणि मी देखील तुला निक्षून सांगतों कीं, तूंही या भानगडींत तोंड घालूं नकोस ! हेंच लग्न होणार !

**विद्यागौरी** : दोन्हीं मुलींचीं लग्नं मी ठरवणार !सावत्र असल्या तरी त्या माझ्या मुली आहेत ! मी त्यांचं काय वाटेल तें करीन !

**कचेश्वर :** दोन्हीं मुलींचीं लग्नं मी ठरवणार ! आणि एकीचं तर मीं ठरवलं देखील ! मी त्यांचा बाप आहें ! मी त्यांचं काय वाटेल तें करीन !

**विद्यागौरी :** मी त्यांना आडांत टाकीन नाहीं तर विहिरींत फेकीन !—

**कचेश्वर :** मी त्यांचा गळा कापीन नाहीं तर जीव घेईन !—

**विद्यागौरी :** तुम्ही कोण मला सांगणार ?

**कचेश्वर :** तूं कोण मला विचारणार ?

**विद्यागौरी :** हें पाहा, तुम्हीं जर आपला हेका चालवलांत तर मी विष खाईन !

**कचेश्वर :** आणि तूं जर आपला हट्ट चालवलास तर मी अफू खाईन !

[ नेत्रा आणि नीरा या दोन्ही बाजूंनीं एकदम येतात.

**नीरा :** ( विद्यागौरीस ) हं, हें घे विष !

**नेत्रा :** ( कचेश्वरपंतास ) हं, आणि ही घ्या अफू—!

**विद्यागौरी :** ( नीरेस ) कारटे—

**कचेश्वर :** ( नेत्रेस ) पोरटे—

**नीरा :** घे हें विष, उशीर करूं नकोस, नाहीं तर मी घेतें !

**नेत्रा :** घ्या ही अफू, नाहीं तर मी घेतें—

**विद्यागौरी :** माझ्या झोळण्यांतली बाटली आणलीस होय ही ?

[ हिसकावून घेते.

**कचेश्वर :** माझ्या फडताळांतील अफू आणलीस होय ग ही ?

[ हिसकावून घेतो.

**नीरा :** रोज रोज तुमचीं भांडणं—वीट आला आम्हांला या घरांत राह्यचा !

**नेत्रा :** तुमच्या भांडणांनीं आमचं डोकं उठलं ! अभ्यासही करूं देत नाहींत, आणि धड लग्नही करून टाकत नाहींत !

**विद्यागौरी :** ( नीरेस ) आतां फाजीलपणानं बोललीस तर डाग देईन तोंडाला !

**कचेश्वर :** ( नेत्रास ) चारगटपणा करशील तर मुस्कटांत भडकावीन चांगली !

**नीरा :** तुमच्या आरडाओरडीनं आळी जमा झालीय रस्त्यावर !

**नेत्रा :** शेजारचे लोक फिदिफिदि हंसताहेत तुमचीं भांडणं ऐकून !

**कचेश्वर :** खिडक्या उघडून बाहेर बघायला सांगितलं कुणी तुम्हांला ? माझा हुकूम मोडतां ?

**विद्यागौरी :** आणि अभ्यास सोडून इथं यायला कोणी सांगितलंय तुम्हांला ? ऐकत नाहीं ?

**कचेश्वर** : लोकांच्या बापाचं काय जातं आहे ? आम्हीं नवरा बायको आहोंत ! आम्हीं भांडूं नाहीं तर वाटेल तें करूं !

**विद्यागौरी**: आम्हीं एकमेकांचा जीव घेऊं !

**कचेश्वर** : नाहीं तर आम्हीं एकमेकांचा गळा दाबूं !

**विद्यागौरी** : आम्हीं एकमेकांचे लचके तोडूं !

**कचेश्वर** : नाहीं तर आम्हीं एकमेकांचे खून करूं !

**विद्यागौरी** : चल, चालती हो, आम्ही भांडणार ! भांडणाशिवाय संसाराला मुळीं गोडीच येत नाहीं !

**कचेश्वर** : चल जा घरांत ! भांडण हा नवराबायकोचा जन्मसिद्ध हक्कच आहे मुळीं !

**विद्यागौरी** : नाहीं तर काय आम्हीं एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून फाजील-पणा करीत बसूं इथं ?

**कचेश्वर** : म्हणजे पाहा तर खरं ! चला व्हा आंत ! खबरदार पुन्हां बाहेर आलांत तर !

**विद्यागौरी** : आम्ही भांडलों तर लोकांच्या पोटांत कां दुखतं ? चला व्हा चालत्या !

**नेत्रा** :<br>**नीरा** : } ( एकदम ) भांडा ! भांडा ! ! भांडा ! ! ! खुशाल भांडा !

[ दोघी दोन्ही बाजूंनीं निघून जातात.

**कचेश्वर** : असल्या कृतघ्न कारट्यांना यापुढें घरांत ठेवण्यांत काय अर्थ आहे ? म्हणूनच त्यांची विल्हेवाट लावण्याच्या मी नादांत आहें.

**विद्यागौरी** : तुम्हीं खूप विल्हेवाट लावाल पण असल्या अडाणी आणि आडदांड पोरींना शिकविल्याशिवाय पतकरणार आहे कोण ?

**कचेश्वर** : तुझ्या फाजील लाडामुळें या पोरी इतक्या शेफारून गेल्या आहेत !

**विद्यागौरी** : तुम्हीं त्यांच्या शिक्षणाची जी आबाळ केलीत त्याचे हे परिणाम भोंवताहेत !

**कचेश्वर** : माझे आई, बस झालं हें शिक्षण ? उद्यांपासून त्या पंडित भुलेश्वराची शिकवणी देखील बंद ! तो आतां आला कीं मीच त्याला सांगतों !

**विद्यागौरी** : आतां मात्र शर्थ झाली ! आपल्या मुलींमध्यें जर कांहीं थोडासा शहाणपणा आला असेल तर तो पंडितजींच्या शिकवणीमुळंच ! मीं तर त्यांना

आपल्या घरांत कायमचंच ठेवून घेण्याचं ठरवलं आहे! आणि तुम्हीं त्यांना काढून टाकण्याची भाषा करतां आहांत! हा कोण उडाणटप्पू डॉक्टर तुम्हीं घरांत आणून ठेवलांत त्याबद्दल मी तुम्हांला अक्षरानं तरी बोललें! मग मीं नेमलेल्या माणसाला तुम्हांला तरी काढण्याचा काय अधिकार आहे? पंडितजींची योग्यता तुम्हांला काय कळणार? पंडितजी म्हणजे ज्ञानाचे महासागर आहेत महासागर!

**कचेश्वर :** पंडितजी जर ज्ञानाचा महासागर तर आपला किशा म्हणजे अकलेचा हिमालयच म्हटला पाहिजे! असले ज्ञानाचे महासागर दहा रुपये महिन्याप्रमाणें गल्लोगल्लीं विकत मिळतात! शिकवणीच्या मास्तरावर माझा मुळींच विश्वास नाहीं! मुलांना शिकवायला ठेवलेले मास्तर हातांतल्या घड्याळाकडे पाहात शिकवतात; आणि मुलींना शिकवायला ठेवलेले मास्तर मुलींच्या चेहेऱ्याकडे पाहात शिकवतात!

**विद्यागौरी :** पंडितजी कांहीं तुम्हीं म्हणतां असले मास्तर नाहींत! इतके दिवस ते आपल्या मुलींना शिकवत आहेत, पण त्यांच्यापैकीं नेत्रा कोणती आणि नीरा कोणती हें देखील त्यांना सांगतां यायचं नाहीं!

**कचेश्वर :** म्हणूनच तर मी म्हणतों कीं असल्या बावळट माणसाची शिकवणी ठेवण्याची आपल्याला बिलकूल जरूरी नाहीं!

[ पंडित भुलेश्वर रागांत प्रवेश करतो.

**भुलेश्वर :** आणि इथं तरी कुणाला जरूरी आहे? बस झाली ही शिकवणी!

**कचेश्वर :** बस झाली कां? मग मी तरी हिला हेंच सांगत होतों!

**विद्यागौरी :** म्हणजे! अहो, काय—म्हणतां काय तुम्ही हें पंडितजी?

**भुलेश्वर :** म्हणतों काय? आतां यापुढें म्हणायची कांहीं सोयच राहिली नाहीं! खूप शोभा झाली आमची आज! तो—तो—नरपशू—कोण दरवाजावर नवीन ठेवला आहे तो—

**विद्यागौरी :** म्हणजे तो भय्या—? काय केलं त्यानं?

**भुलेश्वर :** काय केलं म्हणून काय विचारतां? दरवाजांत पाऊल टाकतांच त्यानं हातांतल्या सोट्यानं चांगलीच पंचारती केली आमची! डोक्याचा नारळही नैवेद्याला फोडत होता आणखी! पण पायाच्या पराक्रमामुळें कसा तरी बचावलों! यापुढें या घरांत पाऊलही टाकणार नाहीं मी! हा चाललों!

**विद्यागौरी :** थांबा, थांबा, पंडितजी, क्षमा करा! असे रागावूं नका! (कचेश्वरास)

पाहिलेत तुम्हीं नेमलेल्या माणसाचे प्रताप ! बरं तर बरं ! नाहीं तर आपल्या दरवाजांत आज ब्रह्महत्त्या घडत होती. असला कसला हा मेला चांडाळ भय्या !

**भुलेश्वर :** विद्वान् माणसांचा असा धडधडीत अपमान ! गुरुजनांची अशी अप्रतिष्ठा ! छे, माझ्या अंगाचा अगदीं संताप झालाय ! असं वाटतं कीं घ्यावा तोच सोटा—पण नको ! ब्राह्मण असल्यामुळें माझा नाइलाज झालाय ! क्षत्रिय असतों तर अगदीं निर्भय्या करून टाकली असती आज ही पृथ्वी !

**कचेश्वर :** अरे—अरे—अरे, हा ज्ञानाचा महासागर तोंडाला फेंस येईपर्यंत घुसळलेला दिसतोय आमच्या भय्यानं ! पण पंडितजी, तुम्ही सांगतां तितकं कांहीं लागलेलं दिसत नाहीं तुम्हांला !

**भुलेश्वर :** आतां माझ्या कवटीचे चार तुकडे आणून तुमच्या हातावर ठेवल्या-शिवाय तुम्हांला माझं म्हणणं पटायचं नाहीं ! माझी बत्तीशी अगदीं सपशेल बाहेर आली तरी तुम्ही म्हणायचे कीं हा हंसतो आहे म्हणून ! पण मला करायचंय काय तुमच्या वाटण्याशीं ! हा मी चाललों ! दाखवा मला तुमच्या वाड्याचा—मागला दरवाजा !

**विद्यागौरी :** मी तुम्हांला साफ सांगतें, कीं दरवाजावरचा हा चावरा कुत्रा तुम्ही आत्तांच्या आत्तां हांकलून द्या पाहूं ! असला आडदांड राक्षस करायचाय काय आपल्याला ? आज पंडितजींना त्यानं मारलं, मघाशीं त्यानं त्या तारवाल्याला अडकवलं, उद्यां आपल्या घरांत हा एखाद्याचा खून करायचा ! दुष्ट कसाई मेला !

**कचेश्वर :** भय्याची कांहीं चूक नाहीं त्यांत ! यांना आपलं तोंड उघडायला काय झालं होतं ?

**भुलेश्वर :** अहो, भय्यानं सोटा उगारतांच माझी सपशेल दांतखिळी बसली ! आणि तोंड उघडायला पाहिजे होतं म्हणून काय सांगतां ! मी जर जास्त कमी बोललों असतों तर त्यानं माझे बत्तीस दांत उलगडून माझ्या हातांत ठेवले असते ! उलट तोच मला इतकं बोलला—

**विद्यागौरी :** काय बोलला ?

**भुलेश्वर :** अत्यंत वाईट—वाईट बोलला !

**कचेश्वर :** अहो, पण बोलला तरी काय ?

**भुलेश्वर :** अत्यंत अश्लील—अश्लील बोलला ! काय बोलला तें मला यांच्या देखत सांगतां यायचं नाहीं ! इतकं अश्लील बोलला ! त्याच्या त्या हिंदी भाषेंत

त्यानं नाहीं नाहीं त्या मला शिव्या दिल्या. हिंदी भाषेंत दिलेल्या शिव्या जिवाला किती झोंबतात तें तुम्हांला सांगून कळायचं नाहीं. छे, छे, हिंदी ही राष्ट्रभाषा व्हावी या मताच्या विरुद्ध झालों आहे मी आजपासून !

**कचेश्वर :** मग, काय म्हणणं तरी काय आहे तुमचं ?

**भुलेश्वर :** अहो, म्हणायचंय काय ? म्हणायचं एवढंच कीं झाली एवढी शोभा बस्स झाली ! तुमच्या मुली जाणें आणि ती शिकवणी जाणें ! मला आपली रजा द्या कशी ! (पाठ चोळीत) आः, पाठीचा मणकान् मणका ठणकतो आहे कसा !

**विद्यागौरी :** खरंच ! इतका मार बसल्यानंतर पाठ ठणकेल नाहीं तर काय होईल ?

**कचेश्वर :** पंडितजी, तुम्ही सांगतां हा प्रकार आतां झाला नसता तरी आजपासून मी तुम्हांला रजा द्यावयाचंच ठरवलं होतं ! तुमच्या शिकवणीमुळं माझ्या मुलींच्या अकलेचा आतांपर्यंत जो बोजवारा झाला आहे तो पुरे आहे ! यापुढें तुम्हीं आपल्या ज्ञानाचा उपयोग गांवांतील इतर लोकांचीं मुलेंबाळें बिघडवण्याकडे करावा हेंच योग्य !

**भुलेश्वर :** अपमान—अपमान आहे हा माझ्या ज्ञानाचा आणि विद्वत्तेचा ! काकासाहेब, तुमच्या भय्याच्या मारानं माझ्या देहाला जितक्या यातना झाल्या नसतील तितक्या दारुण यातना तुमच्या बोलण्यानं माझ्या हृदयाला होत आहेत ! या विषयावर मला तुमच्याशीं वादविवादच करावयाला पाहिजे. शिक्षण म्हणजे काय—शिक्षणाचं ध्येय म्हणजे काय—शिक्षणांतील मूलतत्त्वं कोणतीं—

**कचेश्वर :** बस करा तुमचं हें पांडित्य ! अरे किशा, त्या नागनाथाला म्हणावं यांचे काय पैसे झाले असतील ते चुकते करा ! फिरून यांचा संबंध नको !

**विद्यागौरी :** पंडितजी, तुम्हीं यांचं मुळींच ऐकूं नका. तुम्हीं आपले आतां शिकवायला जा कसे. मघांपासून त्या पोरी तुमची वाट पहात बसल्या असतील.

**कचेश्वर :** किती मूर्ख आहेस तूं ! तुला समजत कसं नाहीं कांहीं, कीं एवढ्या मोठ्या विद्वान् माणसाचा या ठिकाणीं अपमान झालेला असतां तो एक क्षणभर देखील इथं कसा राहील !

**भुलेश्वर :** नाहीं—तसं कांहीं नाहीं—तितका कांहीं अपमान झाला नाहीं माझा !

**कचेश्वर :** छे, छे, अपमान झाला नाहीं असं कसं म्हणतां तुम्हीं ? तुमच्या अपमानाला कांहीं सीमा राहिली आहे का ? डोक्यावर सोटा मारायचा म्हणजे काय ! अरेरे, पंडितजी, पाहूं तुम्हांला कुठं लागलं ?

**भुलेश्वर :** नाहीं–नाहीं–तितकसं मला कांहीं लागलं नाहीं–उगीच थोडंसं खरचटलं असेल झालं !

**कचेश्वर :** पाठीचा मणकान् मणका ढिला करायचा म्हणजे काय ! कोण माणूस आहे का हैवान आहे !

**भुलेश्वर :** नाहीं हो, तुम्हीं काय लावून घेतां आहांत एवढं मनाला ! म्हणजे तुम्हांला मीं आतां सांगितलं तें अगदीं शब्दशः थोडंच खरं आहे ! अहो, ही आपली एक सांगायची रीत असते ! त्या भय्याची काय माय व्याली आहे मला मारायला !

**कचेश्वर :** अहो, असं कसं म्हणतां ! भय्यानं तुम्हांला मारलेले तडाखे इथपर्यंत आम्हांला ऐकूं आले ना चांगले ! काय चेष्टा आहे कीं काय ?

**भुलेश्वर :** अगदीं साफ साफ खोटं ! मीं मघांशीं सांगितलं त्यांतलं एक अक्षर देखील खरं नाहीं ! अहो, मी आलों तेव्हां भय्या घोरत पडला होता देवडीवर. मीच त्याला उलट दोन चिमटे घेऊन आलों !

**कचेश्वर :** आणि इतकंही करून वर अश्लील शिव्या द्यायच्या ! आणि त्या चांगल्या मराठींत द्यायच्या सोडून हिंदींत द्यायच्या ! मातृभाषेचा अपमान आहे हा !

**भुलेश्वर :** अहो, आतां काय सांगावं ! त्याचं काय तोंड लागलं आहे मला शिव्या द्यायचं ! तो एक शिवी देईल तर मी लाख शिवी मोजीन कीं ! त्यालाच एकट्याला शिव्या देतां येतात आणि आमचा शब्दकोश काय रिकामा पडला आहे काय ? मी पंडित आहे ! शिव्या देण्याच्या कामांत हार नाहीं जायचा कोणाला ! त्यानं जर मला हिंदींत शिव्या दिल्या असत्या तर मीं त्याला संस्कृतमध्यें शिव्या दिल्या असत्या ! मग मात्र अमरकोशांत नाहीं नाहींत ते शब्द मीं वापरले असते !

**कचेश्वर :** मी जर तुमच्या जागीं असतों तर असल्या शिकवणीवर लाथ मारून चालता झालों असतों !

**भुलेश्वर :** छेः, छेः, विनाकारण असा त्रागा करून कसं चालेल ! या जगांत माणसानं फार विचारपूर्वक वागायला पाहिजे ! असल्या बारक्यासारक्या गोष्टीकडे कोण लक्ष देत बसतो ?

**विद्यागौरी** : पुरे झाली बरं का ही थट्टा! पंडितजी, तुम्हीं आपले आंत शिकवायला जा पाहूं कसे!

**कचेश्वर** : पंडितजी, आजपासून शिकवणी बंद. मुकाट्यानं बाहेरचा रस्ता सुधारा!

**विद्यागौरी** : या घराची मालकीण मी आहें! पंडितजी, तुम्हीं त्यांचं ऐकूं नका!

**कचेश्वर** : या घराचा मालक मी आहें! तुम्हीं तिचं ऐकूं नका पंडितजी!

**भुलेश्वर** : हें पाहा, या घराच्या मालकीचा निर्णय तुम्ही आपापसांत ठरवीपर्यंत मी माझी शिकवणी उरकून घेतों.

[ दाराकडे घाईनें जातो.

**कचेश्वर** : पंडितजी, आजपासून शिकवणीचे पैसे मिळायचे नाहींत! फुकट शिकवायचं असेल तर शिकवा. फार झालं तर एक कपभर काढा देत जाईन रोज माझ्यांतला, तुम्हांला अक्कल येईपर्यंत—म्हणजे जन्मभरच!

**भुलेश्वर** : छे, छे, अहो, ज्ञानदानाच्या आनंदापुढें त्या दीड दमडीच्या धनाची काय किंमत! दुसऱ्याला विनामूल्य ज्ञान देण्यासारखं पुण्य नाहीं या जगांत! शिकवणीचा पैसा घेणें म्हणजे हराम आहे!

[ आंत जातो.

**कचेश्वर** : काय बेवकूफ माणूस आहे हा! लोचट—लाळघोट्या—

**विद्यागौरी** : अहो, काय हें! एवढ्या मोठ्या विद्वान् माणसाला शिव्या देतां! त्यांना ऐकूं गेल्या म्हणजे मग?

**कचेश्वर** : गेल्या तर गेल्या! हल्लींच्या काळीं विद्वान् माणसांना शिव्यांचा कांहींच विधिनिषेध वाटत नाहीं. हे असले विद्वान् जगांत भरलेले आहेत म्हणूनच विद्वत्ता आज कवडीमोलाची झाली आहे! असल्या बेअकली लोकांना डोक्यावर घेऊन नाचणारीं तुझ्यासारखीं मूर्ख माणसं आहेत म्हणूनच त्यांची या दुनियेंत चलती चाललेली आहे, दुसरं काय?

**विद्यागौरी** : जेव्हां तेव्हां तुम्हीं माझ्या माणसांना घालून पाडून बोलतां आणि मला मूर्ख ठरवतां! तुमच्या अकलेचा कुतुबमिनार मोठा आतां आभाळालाच लागलेला आहे कीं नाहीं! कुठला कोण मेला खिंडारांतला जहागिरदार काढला आहे कोणास ठाऊक! ना त्याला शेंडा ना बुडखा! ना पत्ता ना मत्ता! आणि त्याला म्हणे आपली मुलगी द्यायला काढली आहे! मुली म्हणजे काय

सत्यनारायणाचा प्रसाद आहे काय, वाटेल त्या माणसाच्या हातावर ठेवायला ! पैसा खर्च करण्याच्या बाबतींत इतके चिवट मारवाडी आहांत कीं सोंगट्यांच्या खेळांतलं दान देतांना देखील हातांतून कधीं कवडी सुटायची नाहीं ! असे कवडी-चुंबक ! आणि पोरींची वासलात लावतांना हें कर्णाचं औदार्य कोठून आणलंत ?

**कचेश्वर :** पैशाची गोष्ट निराळी आणि पोरींची गोष्ट निराळी ! पैशांत इतका अर्थ भरला आहे म्हणून तर त्याला अर्थ म्हणतात ! पोरींत काय अर्थ आहे ? साऱ्या अनर्थांचें मूळ त्या ! घरांत पैसा वाढायला लागला कीं स्वर्ग दोन बोटं राहतो ! पण घरांत पोरी वाढायला लागल्या कीं बापाला साक्षात् स्वर्ग डोळ्यापुढं दिसूं लागतो ! माझ्या दृष्टीनं लग्नाला आलेल्या मुलींना कवडीची देखील किंमत नाहीं !

**विद्यागौरी :** लग्नाला आलेल्या मुलींनाच काय पण स्वतःच्या लग्नाच्या बायकोला देखील तुमच्या दृष्टीनं एका कवडीचीहि किंमत नसणारच !

**कचेश्वर :** नाहीं, निदान लग्नाच्या बायकोला तरी एका कवडीची किंमत द्यायला माझी हरकत नाहीं. मघाशीं तूं मला कवडीचुंबक म्हणून पदवी दिली नाहींस का ? अग, तूं कवडी आहेस म्हणून तर मी चुंबक आहे !

**विद्यागौरी :** पुरे झाला हा फाजीलपणा तुमचा ! तीन वेळां लग्न झालीं तरी अजून फाजीलपणा कांहीं उतरला नाहीं तुमचा ! शोभतं का असलं बोलणं या वयाला !

**कचेश्वर :** अग, वाढत्या वयाबरोबर फाजीलपणादेखील वाढत जातो. म्हातारे लोक तर अगदीं इरसाल रंगेल असतात—तोंडानं ! वात्रटपणाचा मक्ता काय तरुणांनींच तेवढा घेतला आहे ? आणि तुम्ही बायका काय कमी चावट असतां ! चारचौघी जणी जमलांत म्हणजे काय वाटेल त्या गोष्टी बोलत असतां ! मी ऐकलं आहे चोरून तें !

**विद्यागौरी :** फिरून मीं तुम्हांला सांगते कीं तुम्हीं या लग्नाच्या भानगडींत पडूं नका ! येऊं दे तर खरं इथं मेला, कोण तो जाफराबादचा येणार आहे तो ! त्याच्या चांगल्या झिंज्या ओढते आणि वाभाडेच काढते रक्तबंबाळ होईपर्यंत मेल्याचे !

**कचेश्वर :** तोंपर्यंत तुझा हा पंडित भुलेश्वर शिल्लक तरी राहील का ? जाफराबादच्या जहागिरदारांच्या वाटेला तर तूं जा ! म्हणजे तुला कळेल या तुझ्या अरण्यपंडिताच्या आयुष्याला मी कसा वणवा लावतों आहे तें !

**विद्यागौरी :** मोगलाईच लागली आहे कीं नाहीं ! मीं पाहून ठेवलं आहे, जिथं तिथं तुम्हीं माझा शब्द मोडतां आणि पाणउतारा करतां ! माझं एक एक म्हणणं देखील ऐकलं नाहींत कधीं तुम्हीं आजपर्यंत ! बायकोची एखादी इच्छा पुरवलीत तर कावळा शिवेल ना तिच्या पिंडाला ! इतर नवरे आपल्या बायकोचा एक शब्द देखील खालीं पडूं देत नाहींत !

**कचेश्वर :** तुझा शब्द वरचेवर झेलण्यासाठीं मला माझ्या हातांचं तस्त करूनच तुझ्या मागोमाग हिंडायला पाहिजे !

**विद्यागौरी :** लोक आपल्या बायकांचे किती किती लाड पुरवतात !

**कचेश्वर :** हो, हें म्हणणं सगळं ठीक आहे ! पण तुझं हें पहिलं लग्न असलं तर माझं हें तिसरं लग्न आहे ना ! बायकोचे लाड पुरविण्याची ही आमची तिसरी पाळी आहे, समजलीस ? तिसऱ्या वेळीं नाटक पाहणारा माणूस टाळया तरी किती वाजविणार ?

**विद्यागौरी :** तुम्हीं माझ्या आयुष्याचा अगदीं सत्यानाश करून टाकला आहेत.

फुटकाच कां । नशिबांत प्याला ?
  मुळीं ना सुखाचा । मुखीं थेंब आला !
नच हौस आतां । कसली मनाला,
  पुरा या जगाचा । जिवा वीट आला !

मला समाधान मानण्यासारखी एकही गोष्ट नाहीं या घरांत—कधीं मला बरोबर घेऊन फिरायला जातील का हिंडायला जातील !

**कचेश्वर :** स्वतःच्या बायकोला बरोबर घेऊन हिंडायला मी कांहीं मूर्ख नाहीं. म्हणजे, आज नुसतें घरांतच हंसू होतें आहे, तें साऱ्या गांवांत व्हावयाचें.

**विद्यागौरी :** माझ्यामुळं तुमचें हसूं होतें काय ? ठीक आहे. मग मी माहेरींच चालती होतें कशी !

**कचेश्वर :** ( बोटें मोजून ) सतरादीं एकसष्ट !

**विद्यागौरी** : सतराशें एकसष्ट काय ?

**कचेश्वर** : किती वेळां माहेरीं जाण्याच्या तूं धमक्या दिल्यास तें मोजतो आहें आजपर्यंत सतराशें साठ वेळां सांगितलें असशील तूं, कीं मी माहेरीं जाणा म्हणून ! ही सतराशें एकसष्टावी वेळ !

**विद्यागौरी** : तुम्हांला खरं वाटत नाहीं काय माझं म्हाणणं ? बरं आहे तर ! मग आजच तुम्हांला माझ्या म्हणण्याची प्रचीती दाखवितें ! ही अस्शीच्या अर्शी मी माहेरीं चालती होतें !

**कचेश्वर** : एवढें आमचें भाग्य कुठून असणार ?

**विद्यागौरी** : काय म्हणालांत ?

**कचेश्वर** : तुला नाहीं ! स्वतःशींच बोललों !

**विद्यागौरी** : स्वतःशीं बोलायला काय हें नाटक आहे काय ? जातेंच मी माहेरीं ! माणसाची किंमत तें गेल्याशिवाय कळायची नाहीं !

**कचेश्वर** : या रीतीनें तरी मला तुझी किंमत एकदांची कळूं दे. बरं पण हें बघ, माहेरीं गेल्यावर पत्राबित्र पाठवीत जा !

**विद्यागौरी** : पत्र कशाला ? तारच पाठावेतें चांगली—मी मेल्याची ! म्हणजे अस्थि गोळा करायला तरी यावं लागेल !

**कचेश्वर** : नाहीं–मीं स्वतः येणार नाहीं ! मी नागनाथलाच पाठवून देईन ! बरं पण, अस्थि गंगेंत टाकायच्या कीं गोदावरींत टाकायच्या तेवढं आपलं सांगून ठेव !

**विद्यागौरी** : तुम्ही कसले माझीं हाडं पाण्यांत फेंकून द्यायला ! एखाद्या साखरेच्या कारखान्याला तीं विकून त्यावर चार पैसे मिळवाल ! शक्य नाहीं मी आतां या घरांत राहणं !

**कचेश्वर** : अरे किशा, तिकडे नागनाथाला सांग, म्हणावं तुझ्या बाई फार दिवसानं माहेरीं जायला निघाल्या आहेत. म्हणावं, त्यांची आत्तांच्या आत्तां सारी व्यवस्था करा !

**विद्यागौरी** : ( वेडावून ) हो–जा ! चार माणसं जमा करा ! आणि सारी व्यवस्था करा—शेवटची !

**कचेश्वर :** आणि म्हणावं आगगाडीची तिकीटहि काढून आणा लवकर !

**विद्यागौरी :** आगगाडीच्या तिकिटापेक्षां म्युनिसिपालटीचा पास आणा काढून म्हणावं !

**कचेश्वर :** मग आतां उशीर कां ? शुभस्य शीघ्रम् !

**विद्यागौरी :** मग मी जाऊं तर–पाहा ! फिरून एकदां विचारतें—जाऊं ?

**कचेश्वर :** आतां मी तरी काय बोलूं ? दुःखानं माझं अंतःकरण भरून आल्यामुळं मला एक शब्द देखील बोलवत नाहीं ! एवढा निश्चय केल्यानंतर आतां जायलाच पाहिजे तुला ! आतां कांहीं उपाय आहे का त्याला ?

**विद्यागौरी :** ( एकदम त्वेषानें ) माझं अडलं आहे खेटर माहेरीं जायला ! ( वेडावून ) म्हणे त्याला आतां कांहीं उपाय आहे का ?

**कचेश्वर :** ( घाबरून ) कां, फिरला वाटतं निश्चय ?

**विद्यागौरी :** या जन्मांत कधीं माहेरीं जाणार नाहीं मी ! तुम्हीं माझ्या माहेरीं जाण्यासाठीं टपूनच बसला आहांत जसे ! म्हणजे मग इकडे दोन्हीं पोरींच्या संसाराचं वाटोळं करायला आपले खुशाल मोकळे ! मी पाहात होतें आपली गंमत ! मी जातें म्हणालें तर आपले म्हणतात जा म्हणून ! एका शब्दानं देखील मला जाऊं नकोस म्हणून सांगितलं नाहींत !

**कचेश्वर :** पण तूं माहेरीं गेलीस म्हणून त्यांत बिघडलं काय ? खच्ची केल्या-शिवाय झाड वाढत नाहीं, आणि बायको माहेरीं गेल्याशिवाय प्रेम वाढत नाहीं !

**विद्यागौरी :** तुम्हीं जा म्हणून सांगितलंत तरी मी जायची नाहीं या घरांतून समजलांत ! जाऊं द्या; मला तरी काय करायचंय विनाकारण बडबडून ? तुमच्या संसारांत मला काडीचं देखील सुख व्हायचं नाहीं हेंच खरं ! दोन बायका उगाच नाहीं मेल्या ! तिसरीच्याही मरणाची फार दिवस नको वाट पाहायला ! म्हणतात ना, माकणीचा बैल अन् तिजवराची बाईल !

[ रागारागानें निघून जाते.

**कचेश्वर :** कुठूनं झक मारली आणि या तिसऱ्या लग्नाच्या फंदांत पडलों, असं झालं आहे मला ! लग्न करणं हें देखील एक व्यसनच आहे ! एकदां जडलं म्हणजे कांहीं केल्या सुटत नाहीं ! उपाशी पोटीं पाणी पिऊं नये आणि उतार वयांत बायको करूं नये हेंच खरं ! हिच्या बडबडीनं डोकं उठलं माझं ! रोज हा असा प्रकार

चालतो; मग माझी प्रकृति का नाहीं बिघडायची ? इतका वेळ झाला तरी हा किशा अजून काढा आणतो आहे ! कुठं—गेलाय तरी हा कुठं कुणाची कंबर बांधायला ! सगळीं माणसं कशीं अगदीं एकाहून एक वरचढ मिळालीं आहेत ! किशा—ए किशा—

[ किशा कांहीं सामान घेऊन येतो.

गद्धया, माझा काढा कुठं आहे ? का पिऊन टाकलास तूं ?

**किशा** : काढा अजून आटतुंया !

**कचेश्वर** : सकाळपासून ओरडून ओरडून माझं शेरभर रक्त आटलं तरी अजून तुझा पावशेर काढा आटतोय काय ? आणि हें रे काय आणलंस, बैला ! तुला चाटण आणि मधाची बाटली आणायला सांगितली होती ! तर हें मलम आणि ही एरंडेल तेलाची बाटली कशाला आणलीस ? ओतूं का तुझ्या नरड्यांत ही, म्हणजे करशील घरभर नाच ! आणि मूर्खा, तुला गोळ्या कशाच्या आणायला सांगितल्या होत्या ! कफसंजीवनीच्या गोळ्या आणायच्या सोडून या कामवर्धिनीच्या गोळ्या कशाला आणल्यास ?

**किशा** : वाइच गफलत झाल्यागत दिसतिया ! आतां त्या तुमच्या फडताळांत बाटल्यांचा बाजार भरलाया अक्शी ! त्यांतून आनूं तरी कनती बाटली हुडकूनशान ?

**कचेश्वर** : चल निघ, बेवकूफ ! फिरून घेऊन ये त्या साऱ्या जिनसा ! आतां पुन्हां चूक करशील तर काढेचिराइताची पेंढी कोंबीन तुझ्या घशांत ! छेः, माझ्या डोक्याचा अगदीं संताप झाला ! ( स्वतःची नाडी तपाशीत ) एँः ! माझी नाडी कुठं आहे ? का बेपत्ता झाली ? किशा, ए किशा, त्या डॉक्टरनां बोलाव ताबडतोब ! तो इतका वेळ कोणाचा पंचनामा करीत बसला आहे कोणास ठाऊक ! आणि किशा, माझी गुडगुडी घेऊन ये ती ! किशा—थांब, पळतोस काय घराला आग लागल्यासारखा असा ! नीट ऐकून घे सारं ! त्या नेत्राला पाठवून दे इकडे—म्हणावं मीं ताबडतोब बोलविलं आहे ! जा ! ( किशा जातो ) या पोरीला तिच्या लग्नासंबंधीं थोडंसं सांगून ठेवायलाच पाहिजे. नाहीं तर ऐनवेळीं ती पोरटी गोंधळ करायची आणि जहागिरदारसाहेबांचा अपमान व्हायचा ! म्हणजे मग सगळाच जमवून आणलेला घाट फिसकटायचा !

[ चित्रा येते.

**चित्रा :** काका—इश्श ! मला का तुम्हीं हांक मारलींत !

**कचेश्वर :** कोण चित्रा ? ( त्रासून ) तुला कोणी बोलावलं इकडे ? हा त्या किशाचा उद्योग असेल ! त्याला नेत्राला हांका मारायला सांगितलं तर त्यानं या चित्राला पाठवून दिली ! चित्तरच आहे लेकाचा !

**चित्रा :** नाहीं हो काका, त्यानं किनई मला सांगितलं कीं काढोपंतानं तुला आतांचे आतां बोलावलं आहे !

**कचेश्वर :** कोण काढोपंत !

**चित्रा :** तुम्हांला किनई किशा काढोपंत म्हणतो बरं का काका !

**कचेश्वर :** अरे चोरा, मला काढोपंत म्हणतोस काय ! थांब, त्याचाच काढा आटवतों चांगला !

**चित्रा :** आणि तो स्वयंपाकघरांत गडीमाणसापुढं तुमची रोज नक्कल करतो. आणि माझ्याशीं देखील तो कधींकधीं वात्रटपणा करतो बरं का काका !

**कचेश्वर :** तूं एक गाढव आणि तो सात गाढव ! चल जा ! तुला सांगून ठेवलं आहे ना मागंच, कीं इकडे यायचं नाहीं माझ्या दिवाणखान्यांत ! वेडपट कुठली !

**चित्रा :** हें हो काय काका असं करतां ? खरंच, काका, किनई तुम्हीं मला फार फार आवडतां !

**कचेश्वर :** जातेस कीं नाहीं आधीं ! लोचट कुठली !

**चित्रा :** मग पुन्हां केव्हां येऊं भेटायला ?

**कचेश्वर :** आतां जा म्हणतों ना ! ( डॉक्टरचें सोंग घेतलेला अरविंद येतो. ) डॉक्टर, या कार्टीचं डोकं तपासा हो !

**चित्रा :** नाहीं हो डॉक्टर ! माझं डोकं नका तपासूं ! माझी जीभच तपासा ! माझ्या जिभेला किनई कालपासून मुळीं चवच नाहीं ! हं, तपासा माझी जीभ ! ( डॉक्टरांच्या तोंडाजवळ तोंड नेऊन जीभ बाहेर काढते. )

**अरविंद :** हं—हं—हं—दूर ! दूर ! रोग्यांनीं डॉक्टरांशीं इतकी लगट करूं नये ! कोण ही ?

**कचेश्वर :** अहो, ही आमची पुतणी चित्रा ! लहानपणापासून ही अशी वेडसर आहे ! सगळे इलाज करून थकलोंत हिच्या बाबतींत ! हिच्या लग्नाची फार पंचाईत होऊन पडली आहे ! हें असलं वेडं भूत कोण पत्करणार ! ( थांबून ) डॉक्टर,

मला एक युक्ति सुचली आहे. सांगूं ? तुम्हींच हिला पदरांत घेऊन टाका म्हणजे झालं ! म्हणजे खटखट मिटली ! ( अरविंद एकदम डोळे मिटून मागील खुर्चीवर बसतो. घाबरून ) काय झालं हो ?

**अरविंद** : छातीमध्यें जबरदस्त धसका बसला माझ्या. आणि हृदय जवळजवळ बंद पडल्यासारखं वाटतंय ! काकासाहेब, या पोरीला आधीं इथून पिटाळा तर मला बरं वाटेल !

**चित्रा** : ( अरविंदाच्या जवळ जाऊन लाडिकपणें ) डॉक्टर, कसं वाटतंय तुम्हांला !

**अरविंद** : अरे बापरे, मेलों ! ( डोळे मिटतो. ) अहो, काढा तिला बाहेर !

[ कचेश्वर चित्राचा दंड धरून तिला खोलीबाहेर घालवतो.

**चित्रा** : ( जातां जातां अरविंदकडे पाहून व लाजून ) डॉक्टर, इश्श !

[ जाते.

**अरविंद** : ( डोळे उघडून व सुस्कारा टाकून ) काकासाहेब, तुम्ही माझी छाती तपासा पाहूं !

**कचेश्वर** : छान ! म्हणजे माझी नाडी तपासायला मीं तुम्हांला बोलावलं आणि तुम्हींच मला छाती तपासायला सांगतां आहांत ? खूप डॉक्टर आहांत !

**अरविंद** : नाहीं, लहानपणापासून मला थोडासा छातीचा विकार आहे !

**कचेश्वर** : अलीकडच्या तरुण मंडळींना छातीचे रोगच फार जडतात ! माझी छाती बघा ! तीन लग्नं केलीं तरी माझी छाती आहे तशी मजबूत आहे अजून !

**अरविंद** : नाहीं, तुम्हीं म्हणजे दांडग्याच छातीचे ! त्याशिवाय का तीन लग्नं होतात !

**कचेश्वर** : अलीकडे या पोरींच्या आणि आमच्या कुटुंबाच्या कटकटीनें मी जेरीस आलों आहें अगदीं ! सकाळपासून संध्याकाळपर्यंत हा औषधांचा मारा चालविला आहे. म्हणून मी तुम्हांला असा दिसतों आहें ! तुम्हांला तरी मीं एवढ्याचसाठीं ठेवलं आहे !

**अरविंद** : तुम्हीं हीं देशी औषधं घेण्याचं सोडून द्याल—

**कचेश्वर** : हें पाहा भलतंच बोलून मला चिडवूं नका ! आधींच माझं डोकं सतावलं आहे ! तुम्हांला सकाळ संध्याकाळ काढा पाजल्याशिवाय देशी वैद्यकीचं महत्त्व कळायचं नाहीं. तुम्हांला मीं नाडी पाहायला बोलावलं होतं. उपदेश

करायला नाहीं ! बघा पाहूं माझी नाडी; मघाशीं माझ्या हाताला‌च लागत नव्हती ! आतां तरी आली का पाहा !

**अरविंद :** ( कचेश्वराची नाडी तपाशीत ) छेः, कुठं पत्ता नाहीं तुमच्या नाडीचा. आणि कसा असेल ? काकासाहेब, तुम्हांला माझं एक सांगणं आहे. तुम्हीं एकसारखा डोक्याचा संताप करून घेत जाऊं नका ! म्हणजे त्याचा अर्थ असा, कीं घरांतल्या मंडळींच्या–म्हणजे विशेषतः तरुण मंडळींच्या इच्छेला विरोध करीत जाऊं नका !

**कचेश्वर :** नाडी तपासा–नाडी तपासा–भलता फाजीलपणा करूं नका ! माझ्या प्रकृतीविषयीं बोलत जा ! घरच्या भानगडीविषयीं सल्ला नको आहे मला तुमचा ! म्हणे तरुण मंडळींच्या इच्छेला विरोध करूं नका ! मग काय त्यांच्या हातांत कोलीत पेटवून देऊं ? या घरांत माझ्या एकट्याच्याच इच्छेप्रमाणें साऱ्या गोष्टी होणार ! मग बेहत्तर आहे माझी नाडी बंद पडली तरी !

[ नेत्रा येते.

**नेत्रा :** काय बाबा ?

**कचेश्वर :** नेत्रा, इकडे ये अशी. इथं बैस. डॉक्टर, तुमचं काम चालूं द्या. नेत्रा, मघाशीं मी तुझ्यावर रागावलों म्हणून भिऊं नकोस ! मी तुला एक अत्यंत आनंदाची बातमी सांगणार आहें.

**नेत्रा :** कसली बाबा ?

**कचेश्वर :** मीं तुझं लग्न ठरवलं आहे ! अशी घाबरून पाहूं नकोस ! अगदीं तुला आवडेल अशाच माणसाशीं ! कां–कशी हंसलीस ! ( डॉक्टरास ) काय हो, तुम्हीं कां दचकलांत !

**अरविंद :** नाहीं, नाडी हाताला लागल्यासारखी वाटली !

**कचेश्वर :** आजपर्यंत तुझ्या मनाविरुद्ध वागत आलों याबद्दल मला फार वाईट वाटतं !

**नेत्रा :** ( स्वगत ) खास, यांनीं माझं अरविंदाशींच लग्न ठरवलेलं दिसतं आहे ! ( उघड ) असं काय बोलतां बाबा ?

**कचेश्वर :** पण आतां यापुढं अगदीं तुझ्या मनाप्रमाणं वागायचं ठरविलं आहे मीं !

**अरविंद :** ( स्वगत ) म्हणजे, या म्हाताऱ्याला खरंच पश्चात्ताप झाला आहे कीं काय ? मग माझं भाग्यच उलगडलं म्हणायचं ! अहाहा, नेत्राला कल्पना असेल

का कीं तिचा लाडका अरविंद तिच्यापासून एका हातावरच या ठिकाणीं बसला आहे म्हणून !

**कचेश्वर :** आतां यापुढें कीं नाहीं आमची नेत्रा म्हणेल तसं करायचं ! कां खूष झालीस कीं नाहीं ?

**नेत्रा :** बाबा, तुम्हीं मला अतिशय आवडतां !

**कचेश्वर :** बरं का नेत्रा, आणि आज तर तुला मीं अगदीं आश्चर्यचकित करून सोडायचं ठरविलं आहे ! आज किनई तुझी आणि तुझ्या या आवडत्या माणसाची गांठच घालून देणार आहें मी प्रत्यक्ष !

**अरविंद :** ( स्वगत ) खास, मला या म्हाताऱ्यानं ओळखलं ! आतां हा बहुतेक आमचे हात हातांत घालून आशीर्वादच देणार ! अहाहा, मला कल्पना नव्हती कीं माझ्या या कपटनाटकाची अखेर पहिल्या अंकांतच इतक्या आनंददायक तऱ्हेनं होईल म्हणून !

**नेत्रा :** इश्श ! बाबा म्हणजे आपली उगीच एखाद्याची थट्टा करतात !

**कचेश्वर :** हें बघ, आतां उगीच सोंग नको आणूंस ! तुम्ही पोरी म्हणजे भारी लबाड असतां ! लग्नाचं नांव काढलं म्हणजे कशा साखरेच्या उकळ्या फुटतात तुमच्या पोटांत ! पण बाहेरून जसं कांहीं–अं–हं ! कां, कसं ओळखलं तुमचं गुपित ! ( कचेश्वर हंसतो, तशी नेत्रा हंसते. ) अग लबाडे—

**नेत्रा :** ( रडका चेहरा करून ) आतां बाबा, मी तुमच्याशीं बोलायची नाहीं बरं का–

**कचेश्वर :** आतां तिकडची स्वारी आली कीं मग माझ्याशीं बोलायला तरी फुरसत मिळेल का ? हाः हाः हाः ! ( मोठमोठ्यानें हंसतो. तसा अरविंदहि हंसतो. ) काय हो, तुम्हांला काय हंसायला झालं ?

**अरविंद :** ( स्वगत ) काय बिलंदर आहे लेकाचा ! ताकास तूर लागून देत नाहीं अगदीं ! ( उघड ) नाडी सांपडली कीं तुमची ! ( मोठ्यानें हंसतो तसा कचेश्वरहि हंसतो. )

**कचेश्वर :** मग आतां बोल नेत्रा, तुझं काय म्हणणं आहे या बाबतींत ?

**नेत्रा :** बाबा, तुमच्या इच्छेबाहेर मी कधीं तरी असतें का ? नाहीं, तुम्हींच सांगा, असतें का ? तुम्हीं सांगाल त्याच्याशीं डोळे मिटून मला लग्न करायला नको का ?

**कचेश्वर :** नेत्रा, वाटेल त्या माणसाशीं तुला डोळे मिटून लग्न करायला मी लावीन, असं कां तुला वाटतं ? तुला पसंत पडेल असंच माणूस आहे हें ! हवं असेल तर आत्तां दाखवतों तुला !

**नेत्रा :** ( स्वगत ) अरविंदांना यांनीं आंतल्या खोलींत तर आणून बसवलं नसेल ना ? ( उघड ) छेः, बाबा, मला त्यांना मुळींच पाहाण्याची इच्छा नाहीं ! विनाकारण तसदी कशाला ?

**कचेश्वर :** छेः, छेः, तसदी कसली त्यांत ? अगदीं माझ्याजवळच आहे इथं तें माणूस म्हणेनास !

**अरविंद :** ( स्वगत ) आतां तर काय अगदीं स्पष्टच झालं सगळं ! परमेश्वरा, तूंच हा भाग्याचा दिवस दाखवलास !

**कचेश्वर :** काय ग , दाखवूं का तें माणूस तुला ! दाखवूं का ? हं, लाजायबिजायचं नाहीं ! डॉक्टर, तोंड वासून वर काय बघतां ? नाडी तपासा नीट !

**अरविंद :** ( स्वगत ) काय बेमालूम नाटक करतो आहे हा म्हातारा ! ( उघड ) अहाहा, काकासाहेब, धन्य धन्य आहांत तुम्हीं !

**कचेश्वर :** कां, जोरानं धांवायला लागली का नाडी ? वा छान ! आतां सोडा पाहूं माझा हात !

**अरविंद :** आणि हा घ्या माझा हात !

**कचेश्वर :** तुम्हांला कोणी सांगितलंय मधें हात घालायला ! ( खिशांतला एक फोटो झटकन् काढून ) नेत्रा, हें बघ तुझं माणूस !

[ तिच्यापुढं फोटो करतो.

**अरविंद :** ( स्वगत ) म्हणजे, हा कुणाचा फोटो ?

**नेत्रा :** ( प्रथम फोटो पाहाण्यास लाजते, पण फोटो पाहातांच एकदम उठते.) म्हणजे, हे कोण ?

**कचेश्वर :** कां, आतां कां लाजतेस ? आवडलं का आम्हीं पसंत केलेलं माणूस ? यांच्याशींच मीं तुझं लग्न ठरवलं आहे ! हेच ते जाफराबादचे जहागिरदार !

**अरविंद :** कोण–जाफराबादचे जहागिरदार !

**कचेश्वर :** तुम्हांला सांगितलं ना मधें बोलूं नका म्हणून ! नेत्रा, अग आतां तूं जहागिरदारीण होणार ! आहेस कुठं ? दागदागिने, कपडेलत्ते, गडीमाणसं, गाडीघोडा—काय विचारूं नकोस ! अगदीं चंगळ आहे तुझी. आतां बाराच्या गाडीनं जहागिरदारसाहेब येणार आहेत इथं ! नागनाथ आतां स्टेशनवर निघाला देखील असेल ! अग, दोन दिवसांच्या आंत तुझ्या लग्नाचा बार उडवून टाकतों ! अशी पहातेस काय भांबावून ? बाकी, इतका श्रीमंत नवरा मिळाल्यावर कोणती पोरगी भांबावून जाणार नाहीं ! चल जा, आतां थांबूं नकोस ! असा झकास

पोषाख आणि नट्टापट्टा करून येशील म्हणतेस चहा द्यायच्या वेळीं, कीं तुला पाहातांच जहागिरदारसाहेबांनीं लोळणच घेतली पाहिजे तुझ्या पायाशीं! मात्र तुझ्या हातांतला कढत कढत चहा त्यांच्या डोक्यावर सांडूं नकोस अं!

[ मोठ्यानें हंसतो.

**अरविंद :** ( स्वगत ) या वेळीं माझ्याच टाळक्यावर कुणी कढत चहा ओतला तर बरं होईल!

**नेत्रा :** बाबा, मी तुम्हांला साफ सांगतें, मी प्राण गेला तरी या जहागिरदाराशीं लग्न करणार नाहीं!

**कचेश्वर :** काय म्हणतेस? तूं त्याच्याशीं लग्न करणार नाहींस? बेशरम, उर्मट, माझ्या तोंडावर असं सांगतेस! माझा अपमान करतेस! मग आतांपर्यंत हें मानभावीपणाचं सोंग कशाला केलंस?

**नेत्रा :** मला वाटलं कीं तुम्हीं अरविंदासंबंधीं बोलतां आहांत म्हणून!

**अरविंद :** मला देखील तसंच वाटलं!

**कचेश्वर :** अहो, मधें बोलूं नका ना तुम्हीं! तुमचा काय संबंध आहे इथं? कोण तो अरविंद्या—ज्याच्या कमरेवर लाथ मारून मीं हांकून दिला तो! त्याच्याशीं तुला लग्न करायचंय काय? मग प्राण गेला तरी मी त्याच्याशीं तुझं लग्न होऊं देणार नाहीं!

**नेत्रा :** लग्न करीन तर मी अरविंदाशींच करीन!

**अरविंद :** शाबास! ( कचेश्वरास ) नाहीं, तुम्हांला नाहीं बोललों! मी आपलं परमेश्वराच्या लीलेचं कौतुक करतों आहें स्वतःशींच!

**कचेश्वर :** येऊं दे तर खरा तो अरविंद्या इथं! त्याची तंगडीच मोडतों! त्याचं थोबाडच रंगवितों! आत्तां जर तो या ठिकाणीं असता तर मीं त्याला खलबत्त्यांत घालून विड्यासारखा कुटला असता! हलकट, दरिद्री, भिकारडा कुठला!

**अरविंद :** थांबा थांबा, काकासाहेब, संतापूं नका! तुमच्या नाडीकडे बघा. बेपत्ता होईल ना ती!

**कचेश्वर :** बेहेत्तर आहे माझी नाडी देशोधडी गेली तरी! माझ्या अंगाची अगदीं आग आग झाली आहे!

**अरविंद :** नाहीं पण, उगाच दुसऱ्या माणसाला त्याच्या पाठीमागें शिव्या देण्यांत काय अर्थ आहे!

**कचेश्वर** : तुम्हीं कोण मला सांगणार ? मी देणार शिव्या त्याला ! पाठीमागेंच काय, पण तो इथं प्रत्यक्ष हजर असता तरी मीं त्याच्या तोंडावर लाख शिव्या मोजल्या असत्या—आणि वर त्याची खेटरांनीं पूजा बांधली असती ! त्यालाच काय पण तुम्हांला देखील मी लाख शिव्या देईन ! मला कोणाची भीति आहे ?

**अरविंद** : झालं, आतां काय तुमच्या त्या नाडीचा निकालच लागला असेल बहुतेक ! अरे किशा, तो काढा तरी घेऊन ये लौकर !

[ किशा एका हातांत काढ्याचें व दुसऱ्या हातांत एनिमाचें भांडें घेऊन प्रवेश करतो.

**किशा** : हं, ह्यो घ्या तुमचा काढा !

**कचेश्वर** : काढा ओतून टाक मोरींत !

**किशा** : अन् ही तुमची गुडगुडी !

**कचेश्वर** : हरामखोरा, अरे, हें काय आणलंस ?

**किशा** : म्हंजी, ही तुमची इलायती गुडगुडी नव्ह का ?

**कचेश्वर** : काय बेवकूफ गद्धा आहे हा ! उचल–उचल तें घाणेरडं भांडं इथून ! आणि हो चालता ! चल आटप लवकर, नाहीं तर घालीन पाठींत लाथ ! आणि मला काढोपंत म्हणतोस काय रे ? आणि माझ्या नकला करतोस ? फोडूं का तुझं टाळकं ! चल हो चालता ! ( किशा पळून जातो. ) आज माझ्या डोक्याच्या अगदीं चिंधड्या चिंधड्या उडणार ! आतां तिकडे पाहुणे येणार आणि इकडे हा असा गोंधळ ! पुढल्या माडींत किशानं काय व्यवस्था केली आहे कोणास ठाऊक ? मला प्रत्यक्षच जाऊन पाहायला पाहिजे ! नाही तर त्याला खुर्ची नेऊन ठेवायला सांगितली आहे त्याच्याऐवजीं–तिथं हा कमोद नेऊन ठेवायचा झालं ! नेत्रा, फिरून मी तुला बजावतों एका तासाच्या आंत मी सांगतों त्याप्रमाणें तूं तयार होऊन बसली नाहींस तर निकाल लावून टाकीन मी तुझा !

**नेत्रा** : खुशाल लावा ! माझे तुकडे तुकडे केलेंत तरी मी ऐकणार नाहीं तुमचं !

**कचेश्वर** : कसं ऐकत नाहींस माझं तें पाहतों. तूं नाहीं तुझा बाप ऐकेल !

[ त्वेषानें जातो.

**अरविंद** : मी जरा बोलूं कां थोडंसं ! वडिलांच्या इच्छेप्रमाणें वागण्यांतच आपलं कल्याण आहे !

**नेत्रा** : तुम्हांला कोणी विचारलंय ? तुम्हीं नका करूं चोंबडेपणा मधें !

**अरविंद** : तुम्हांला बरं वाटत नाहींसं दिसतं !

ेत्रा : मला काय धाड झाली आहे बरं न वाटायला ? पण तुम्हांला तरी ठीक ाटतंय ना ?

ारविंद : थांबा, मी जरा तुमची नाडी तपासतों.

ेत्रा : तुम्हीं बाबांची प्रकृति बिघडवतां आहांत तेवढी पुरे आहे. माझ्या नका टेला जाऊं !

ारविंद : तुम्हीं हा जो अरविंद म्हणून कोण म्हणालांत ना मघाशीं, तो—स्पष्ट ांगतो, रागावूं नका—अगदीं हलकट माणूस आहे !

ेत्रा : स्वत:वरून दुसऱ्याची पारख करतां वाटतं ?

ारविंद : मला ठाऊक आहे ना अगदीं, फार पाजी माणूस आहे तो !

ेत्रा : आतां जास्त फाजीलपणा कराल तर बाबांचा हा उरलेला काढा ओतीन मच्या घशांत !

ारविंद : तें कांहीं नाहीं, मला तुमची नाडी तपासायलाच पाहिजे.

[ जवळ जातो.

ेत्रा : दूर व्हा तुम्ही ! माझ्या अंगाला हात लावाल तर ओरडेन बरं कां मी !

ारविंद : तुमची प्रकति फारच बिघडलेली दिसते.

ेत्रा : माझ्या प्रकृतीपेक्षां तुमची दृष्टीच जास्त बिघडलेली दिसते.

ारविंद : तुमच्या चेहेऱ्यावरून मला तुमचं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं !

ेत्रा : आणि मलाहि तुमच्या वागण्यावरून तुमचं लक्षण कांहीं धड दिसत नाहीं !

ारविंद : पाहाणारच मी तुमची नाडी. ( नेत्राचा एकदम हात धरतो. )

ेत्रा : ( हात झटकून ) हलकट माणसा ! बाबा—थांबा, तुमचं सारं बिंग मी ातां बाहेर काढतें !

ारविंद : तूं माझं बिंग बाहेर काढण्यापूर्वी मीच माझ्या हातानं माझं सारं बिंग हेर काढतों ! ( डोळ्यावरचा चष्मा बाजूला काढतो. )

ेत्रा : कोण अरविंद !

ारविंद : मोठ्यानं बोलूं नकोस ! नाहीं तर मग मात्र आपलं हें बिंग खरंच हेर फुटायचं !

ेत्रा : अहाहा, अरविंद, आतां मात्र हा हात जन्मभर हातांत घालून माझी डी तपाशीत बसलांत तरी हरकत नाहीं !

**अरविंद :** आतां तुझी नाडी तपासण्याची काय जरूर आहे ? यापुढं माझीच नाडी तुझ्या हातांत राहणार आहे ! नेत्रा, त्या दिवशीं तुझ्या वडिलांनीं माझा अपमान करून मला घरांतून हांकून दिलं–त्या दिवसापासून मी तुला भेटण्याचा प्रयत्न करीत आहें–त्याला आज यश आलं !

**नेत्रा :** मीं तुम्हांला तुमच्या या पोषाखांत–आणि काळया चष्म्यामुळें मुळींच ओळखलं नाहीं ! काय कारस्थानी आहांत पण तुम्हीं ! छान युक्ति काढलीत इथं यायची !

**अरविंद :** मग काय करूं तर ? तुझ्या वडिलांचं औषधांचं वेड माझ्या पथ्यावर पडलं ! शिवाय, त्यांच्या देशी वैद्यकीच्या अभिमानानें ते मला विलायती वैद्यकी-वर एक अक्षर देखील बोलूं देत नाहींत ! नाहीं तर आमचा हा भ्रमाचा भोपळा पहिल्याच दिवशीं फुटला असता ! डॉक्टरचंच काय पण कंपाऊंडरचं देखील सोंग घेण्याइतकं मला औषधाचं ज्ञान नाहीं ! नाडी आंगठ्याच्या खालीं पहातात का करंगळीच्या बाजूला पाहातात हें देखील अजून मला माहीत नाहीं !

**नेत्रा :** पण मला आश्चर्य वाटतं तें हें, कीं मी तुम्हांला ओळखलं कसं नाहीं ?

**अरविंद :** मला इथं येऊन तर दोनच दिवस झाले ! आणि हा वाडा एवढा मोठा आहे कीं एक महिनाभर जरी इथं कोणी राहिलं तरी एकमेकाचं दर्शन होणं शक्य नाहीं ! याशिवाय माझा हा पोषाख–तूं तर मला विजारींत कधींच पाहिलं नाहींस ! पण सगळ्यांत उपयोगी पडला म्हणजे हा काळा चष्मा ! स्वतःची दृष्टी झांकून दुसऱ्याचे चेहेरे न्याहाळायला हा काळा चष्मा फार सोयीस्कर पडतो !

**नेत्रा :** कुठं मिळवलंत हें ज्ञान ?

**अरविंद :** कॉलेजमध्यें ! तिथं आम्हीं खूप गम्मत करायचे !

[ नागनाथ येतो.

**नागनाथ :** अं, काय रे हें ? अरे, गंमत कसली करीत बसला आहांत तुम्हीं इथं ? तो जाफराबादचा टोणगा तिकडे स्टेशनावर उतरला देखील असेल. आणि तुम्ही इथं हंसत खिदळत काय बसलां आहांत ? तुम्हांला कल्पना आहे तुमच्या संकटाची ?

**अरविंद :** नागनाथ, आमचं सर्वस्व आतां तुझ्याच हातीं आहे. या संकटांतून तुझ्यावांचून आमचं कोण रक्षण करणार ?

**नागनाथ :** असं म्हटलं म्हणजे झालं ! मला कोंबा संकटाच्या तोंडांत—आणि

तुम्हीं इकडे करीत बसा मजा! आणि अरविंद, नमस्कार आहे तुला! तुझ्या-सारखा गाढव माणूस नसेल कोणी! तुला सांगितलं होतं ना कीं इतक्यांत हें रहस्य फोडायचं नाहीं म्हणून!

**नेत्रा** : म्हणजे नागनाथांना माहीत होतं वाटतं हें कारस्थान?

**अरविंद** : अग, त्याचंच तर हें कारस्थान!

**नेत्रा** : तरी मला वाटलं! म्हटलं, तुम्हांला कुठून आली एवढी अक्कल!

**नागनाथ** : आणि असं असूनही स्वतःची अक्कल चालविण्याची याला हौस भारी! म्हणजे प्रत्यक्ष तुम्हांला देखील हें सोंग कळतां कामा नये अशी मी याला ताकीद दिली होती! पण ही स्वारी काय! पहिल्या अंकाच्या शेवटींच तोंडावरचा रंग पुसून मोकळी! तुम्हां तरुण लोकांना मुळीं दमच नाहीं!

**अरविंद** : अरे बाबा, चुकलों! आतां कां उगाच टोंचून बोलतो आहेस! प्रेमाच्या राज्यांत खोटीं सोंगं फार दिवस चालत नाहींत हेंच खरं!

**नेत्रा** : नागनाथ, तुमचे केवढे उपकार आहेत आमच्यावर!

**नागनाथ** : हें पाहा, उपकार शेवटीं मानायचे असतात, सुरवातीला नाहीं! तिकडे दरवाजाशीं शत्रू येऊन ठेपला आहे तुमचा. त्याचा आधीं निकाल लावूं आणि मग एकमेकांचे आभार मानीत बसूं!

**नेत्रा** : नागनाथ, या संकटांतून—

**नागनाथ** : तुम्हीं कांहीं काळजी करूं नका! त्या जाफराबादी रेड्याचा असा धुव्वा उडवून टाकतों कीं तो जीव घेऊन चौखूर पळत सुटला पाहिजे! असं सुंदर कारस्थान रचलंय म्हणतां हें! पांचपंचवीस मंडळी आहेत चांगली माझ्या मदतीला! भितां काय? वाटेल तीं सोंगं करीन, लटपटी करीन—पण तुमचा दोघांचा हा विवाह घडवून आणल्याशिवाय मी कधींहि राहणार नाहीं! तुम्ही अगदीं निर्धास्त असा. हं, अरविंद, आतां वेळ गमावूं नकोस. चल माझ्या-बरोबर. आपल्याला ताबडतोब आतां स्टेशनवर गेलं पाहिजे. काय काय करायचं आतां तें तुला वाटेंत सांगतों.

**अरविंद** : तूं हो पुढं, हा मी आलोंच!

**नागनाथ** : अजून आणखी राहिलं आहे कां बोलायचं? हें पाहा मेहेरबान, तुमचीं तीं प्रेमाचीं लांबलचक व्याख्यानं आतां पुरे बरं का! या कपटनाटकांत लांब लांब भाषणांना मुळीं स्थानच नाहीं! हं, आटप लौकर!

[ जातो.

**त्रा** : डॉक्टर !

**अरविंद** : माझी थट्टा करतेस काय ?

**नेत्रा** : नाहीं, मी तुम्हाला डॉक्टरच म्हणणार ! माझ्या हृदयांतील व्याधि बरी करणं हें आतां सर्वस्वीं तुमच्याच हातीं नाहीं का ?

**अरविंद** : नेत्रा, समज आपल्या दुर्दैवानं नागनाथानं रचलेलं हें नाटक अयशस्वी ठरलं तर ! तुझ्या निश्चयांत बदल तर नाहीं ना होणार ?

**नेत्रा** : अरविंद, हें विचारायला का पाहिजे ? माझ्या प्रेमांत कालत्रयींही बदल होणार नाहीं. मात्र तुम्हीं आपला हा वेष बदलला आहे तसं प्रेम बदलूं नका म्हणजे झालं ! नाहीं तर बोलून चालून तुम्ही पुरुष ! तुमच्या प्रेमाचा झरा कधीं आटेल याचा नेम नाहीं !

**अरविंद** : तर तर ! माझं प्रेम आटायला कांहीं तो तुझ्या वडिलांचा काढा नाहीं !

**नेत्रा** : अहाहा ! अरविंद—

**अरविंद** : नेत्रा—माझ्या प्राणा—

हांसरा चंद्रमा,
उधळित मधुर स्मितचंद्रिका । वाटे.
नयनिं या तारका,
वेधिती जीव हा सारखा;
फुलतसे वदनिं मनोहर काय मोगरा !

[ दोघें एकमेकांचे हात धरून उभे राहातात तोंच चित्रा येते.

**चित्रा** : डॉक्टर, माझी जीभ बघतांना—

**अरविंद** : ( एकदम बाजूला होऊन ) अरे बापरे, ही आली महिषासुरमर्दिनी ! जातों मी ! दुर्दैवं हीं अशीं येतात !

[ घाईघाईनें निघून जातो. नेत्राच्या पुढें जीभ काढून दाखवते. नेत्रा तिच्या अंगावर धांवून जाते. इतक्यांत पडदा पडतो.

# २

स्टेशनजवळचा रस्ता. जाफराबादचा जहागिरदार चांडिराम अत्यंत क्षुब्ध मुद्रेनें प्रवेश करतो. त्याच्यामागून आरडाओरड, हंशा, 'हुर्यो' असा गलका ऐकूं येतो. त्या हुल्लडीला उद्देशून अपशब्द उच्चारीत व फिरफिरून त्वेषानें पाहात तो येतो.

**चंडिराम :** हरामखोर—गळेकापू — पाजी — हलकट — बदमाष — डाकू—डांबीस—भामटे—एक पाऊल तर पुढें टाका—म्हणजे एकेकांचीं थोबाडंच रंगवितों चांगलीं ! कंबर मोडतों–हाडंन् हाडं पिचवून टाकतों ! ( आंतून जोराचा हंशा ) हः—हः—हः ! हः—हः—हः ! काय, वेड लागलंय काय हंसायला ? का नागवं नाचतंय कुणी इथं ! दांत फोडून टाकीन पुन्हां हंसलात तर ! बत्तिशी बाहेर काढीन एकेकाची ! काय, चेष्टा लागली आहे काय ! कोणाशीं गांठ आहे समजलांत तुमची ? म्हटलं जाफराबादचा जहागिरदार आहें मी–जाफराबादचा जहागिरदार ! ( आंतून हुर्यो व हंशा ) अजूनही बेशरमपणानं हंसताहेत ! माणसं आहेत का जनावरं आहेत हीं ! माझी बंदूक घरीं राहिली आहे म्हणून ! नाहीं तर एकेकाला इथल्या इथं गोळी घालून ठार केलं असतं !

[ मागून घाईघाईनें नागनाथ प्रवेश करतो.

**नागनाथ** : तुम्ही व्हा जरा बाजूला ! ( लोकांना उद्देशून ) ए, काय फाजिलपणा चालविला आहे तुम्ही लोकांनीं हा ! चला, होता का नाहीं चालते ! एवढ्या मोठ्या माणसाची भर रस्त्यावर थट्टामस्करी करतां, तुम्हांला लाजा कशा वाटत नाहीत ? ठाऊक आहे तुम्हांला कोण आहेत हे ? हे—हे—( हलक्या आवाजांत ) कुठले जहागिरदार आहांत म्हणालांत तुम्ही !

**चंडिराम** : जाफराबादचे !

**नागनाथ** : हो, जाफराबादचे जहागिरदार आहेत हे ! समजलांत ? अरे, पन्नास लाखांची तर यांची जहागिरी आहे !

**चंडिराम** : छे, छे, इतकी नाहीं !

**नागनाथ** : अहो, आहे हो, पन्नास लाखांची जहागिरी आहे तुमची ! थोडेथोडके नाहीं पांच हजार घोडेस्वार आणि दहा हजार पायदळ आहे यांच्याजवळ ! आहांत कुठं ! हत्ती काय न् शेळ्या काय न् खेचरं काय न् उंट काय—कांहीं विचारूं नका !

**चंडिराम** : छे छे, भलतं काय सांगतां !

**नागनाथ** : जरा गप्प बसा हो तुम्ही ! त्यांच्या मनांत आलं तर ते एकेकाला काळ्या पाण्यावर पाठवतील ! ठाऊक आहे ?

**चंडिराम** : अगदीं नक्की !

**नागनाथ** : एकेकाला हत्तीच्या पायाखालीं देतील !

**चंडिराम** : प्रश्नच नाहीं !

**नागनाथ** : फांसावर चढवतील !

**चंडिराम** : बेशक !

**नागनाथ** : यांच्याकडे बघून हंसायला काय यांच्या डोक्यावर बैलासारखीं शिंगं उगवलीं आहेत का मानेवर वशिंड उठलं आहे यांच्या ?

**चंडिराम** : आतां पाहा म्हणजे झालं !

**नागनाथ** : यांचे कान गाढवासारखे लांब आहेत का यांच्या हनुवटीला बोकडा-सारखी दाढी लोंबते आहे ?

**चंडिराम** : सांगा—सांगा म्हणावं आतां !

**नागनाथ** : कां उंटाप्रमाणं यांचं अंग सतरा ठिकाणीं वांकडं झालं आहे !

**चंडिराम** : दांतखिळी बसली त्यांची ! आतां काय बोलताहेत ते !

**नागनाथ** : अरे, यांच्या चेहेऱ्याकडे नुसती नजर टाका ! दोन्ही गालावरून सौंदर्य नुसतं सांडतं आहे खालीं रस्त्यावर !

**चंडिराम** : तरी मीं आज सकाळीं दाढी केलेली नाहीं.

**नागनाथ** : असल्या थोर माणसाचे पाय आपल्या गांवाला लागले हें तुमचं भाग्य समजा ! माझी तर परमेश्वराजवळ अशी प्रार्थना आहे, की अशा थोर पुण्यवंत प्राण्यांना आणखी दोन पाय उगवावेत आणि त्या सर्व पायांची धूळ आमच्या गांवाला लागावी !

**चंडिराम** : पक्की खोड मोडलीत गुलामांची ! स्टेशनावर उतरल्यापासून या लोकांनीं हा असा पाजीपणा चालविला आहे. मीं पुष्कळ शहरं पाहिलीं असतील आजपर्यंत, पण इतके हलकट लोक मीं दुसरीकडे कुठं पाहिले नसतील ! म्हणजे, दिल्लीचे सोदे आणि पुण्याचे भामटे यांना वस्त्रगाळ करून या गांवांतले लोक निर्माण केले आहेत कीं काय परमेश्वरानं कुणास ठाऊक ! तुम्हीच काय ते सभ्य गृहस्थ भेटलांत मला पहिल्या प्रथम इथं !

**नागनाथ** : आपल्याला इतका त्रास झाल्याबद्दल मला अंतःकरणापासून वाईट वाटतं ! आतां कृपा करून तें सगळं विसरून जा ! या गांवच्या नागरिकांतर्फे मी आपलं प्रेमादरपूर्वक स्वागत करतों.

[ हातांतल्या एका पुड्यांतून एक पिवळ्या फुलांचा हार काढून तो चंडिरामाच्या गळ्यांत घालतो. अरविंद येतो.

**अरविंद** : ओ हो हो ! कोण, जाफराबादचे जहागिरदारसाहेब ! वा वा वा ! अलभ्य लाभ, अलभ्य लाभ ! म्हणजे तुम्हांला दुरून पाहिलं तेव्हां माझा विश्वासच बसेना डोळ्यांवर ! आलांत केव्हां—उतरलांत कुठें—राहाणार किती दिवस—जाणार कधीं ? प्रकृतिविकृति ठीक आहे ना ? प्रवासाचा शीण झालेला दिसतो आहे बराच.

**चंडिराम** : हः हः, कांहीं विशेष नाहीं ! प्रवासांत तितकं चालायचंच ( नागनाथास ) हा कोण माणूस आहे बुवा ?

**नागनाथ** : ( एकीकडे ) मला तरी काय माहीत ? तुमच्या ओळखीचा दिसतो आहे.

**अरविंद** : माईसाहेबांची प्रकृति वगैरे ठीक ?

**चंडिराम** : कोण माईसाहेब ?

**अरविंद** : तुमच्या—त्या—आपल्या माईसाहेब हो—म्हणजे मला वाटतं आई—

**चंडिराम** : आमची आई लहाणपणींच वारली !

**अरविंद** : मलाच उलट सांगतां काय ! मी म्हणतों त्या तुमच्या—त्या हो—

**चंडिराम** : मावशी—

**अरविंद** : बरोबर ! मावशी ! आम्ही त्यांना माईसाहेब म्हणत असूं ! तुम्ही त्यांना म्हणायचे—

**चंडिराम** : अक्कासाहेब !

**अरविंद** : बरोबर ! अक्कासाहेब ! अक्कासाहेबासारखी सालस व प्रेमळ बाई हजारांत सांपडायची नाहीं.

**चंडिराम** : अक्कासाहेब प्रेमळ ! अन् सालस ! साऱ्या गांवची ढालगज ती ! चोवीस तास तिचं तोंड चाललेलं असतं ! मला नको नकोसं करून टाकलं आहे तिनं !

**अरविंद** : लाख बोललांत—ऱ्या टाळी ! आम्हांला काय हें माहीत नाहीं ? पण म्हटलं, थोरामोठ्याविषयीं आपण बोला कशाला ? आतां आपण बोललांत म्हणून ठीक. त्या आल्या कीं नेहमीं म्हणायचे आम्ही, कीं आला अक्काबाईचा फेरा म्हणून ! (दोघेहि हंसतात.) बरं पण, आमच्या मामांचं कसं काय चाललं आहे हल्लीं ?

**चंडिराम** : कोण मामा ?—म्हणजे आमच्या थोरल्या मामाविषयीं म्हणतां काय ?

**अरविंद** : हो, आपले मोठे मामा हो ते ! त्यांना शिकारीचा भारी नाद असायचा ! नेहमीं हरणं मारायचे ते !

**चंडिराम** : आमच्या मामांना शिकारीचा नाद ! कुणी सांगितलं तुम्हांला हें ? म्हणे हरणं मारायचे ते ! माशा मारायचा देखील त्यांना कंटाळा ! उभ्या हयातींत थापाशिवाय त्यांनीं कांहींच मारलं नाहीं !

**अरविंद** : त्यांतलीच एक थाप आम्हांलाही त्यांनीं मारलेली दिसते !

**चंडिराम** : शिकार कसली करताहेत ते ! घराचा उंबरठा ओलांडतील तर शपथ !

**अरविंद** : पक्के घरकोंबडे ते ! म्हणून तर त्यांची प्रकृति अशी !

**चंडिराम** : नाहीं—त्यांची प्रकृति तशी फार उत्तम—

**अरविंद** : म्हणजे मूळचं त्यांचं हाड फार चांगलं—

**चंडिराम** : पण व्यसनापायीं त्यांनीं आपल्या प्रकृतीची माती केली !

**अरविंद** : म्हणजे ? फारच प्यायचे ते !

**चंडिराम** : छेः छेः, तसला मुळींच नाद नव्हता त्यांना—

**अरविंद** : नव्हता ना ? मी तर तेंच म्हणायचा ! पण लोक आपले कांहीं तरीच बोलायचे !

**चंडिराम** : गांजा ! अष्टौप्रहर आपला गांजा !

**अरविंद :** मी तर त्यांना सांगून दमलों. जाऊं द्या झालं! हल्लीं प्रकृति कशी काय आहे त्यांची?

**चंडिराम :** त्यांना वारल्याला आतां एक वर्ष होईल!

**अरविंद :** काय म्हणतां? वारले मामा? (सुस्कारा टाकून) हं, प्रभूची मर्जी! तुम्हीं आम्हांला बोटभर चिठ्ठीनं देखील कळवलं नाहीं हाच का तुमचा आमचा घरोबा? मामांची मूर्ति अगदीं माझ्या डोळ्यांसमोर आहे! त्यांची ती लांब शुभ्र दाढी—

**चंडिराम :** म्हणजे, मामांनी केव्हां दाढी ठेवली होती?

**अरविंद :** अलिकडे त्यांनीं ती काढून टाकली होती; पण लहानपणीं—

**चंडिराम :** लहानपणीं दाढी होती त्यांना?

**अरविंद :** त्यांच्या लहानपणीं नाहीं हो—आपल्या लहानपणीं!

**चंडिराम :** (नागनाथास) या गृहस्थाला आमच्या घरची अगदीं खडान् खडा माहिती दिसते आहे सारी! आणि मी मघांपासून प्रयत्न करतों आहे, पण कांहीं केल्या याचं नांव आठवत नाहीं!

**नागनाथ :** कित्येक वेळां होतं असं!

**अरविंद :** मला प्रथम थोडी शंका होती—म्हटलं, तुम्हीं मला ओळखतां किंवा नाहीं! हो, तुम्हीं पडलांत मोठीं माणसं! आमच्यासारख्या गरीबाची तुम्ही कशाला ओळख ठेवतांय!

**चंडिराम :** छे, छे, तुमच्या बाबतींत असं कसं होईल माझ्या हातून! मीं तुम्हांला अगदीं पाहिल्याबरोबरच ओळखलं! तसं म्हटलं तर आपल्याला भेटून किती वर्षें झालीं पहा—

**अरविंद :** किती वर्षें कोठलीं? गेल्याच वर्षी नव्हतों का आम्ही आलों जाफराबादला? चांगला महिनाभर मुक्काम होता आमचा तिथं!

**चंडिराम :** अरे हो, खरंच कीं! (स्वगत) छे, अजून कांहीं ध्यानांत येत नाहीं याचं नांव!

**अरविंद :** एखाद्या राजाची व्यवस्था ठेविली नसेल अशी तुम्हीं आमची बरदास्त ठेविली होती! तुमची गडीमाणसं न् गाड्याघोडे अगदीं अष्टौप्रहर आमच्या तैनातींत असायचीं! आणि रोज सकाळ संध्याकाळ तुमच्या त्या पंचपक्वान्नाच्या मेजवान्या! त्यामुळं तर आम्ही अगदीं जेरीस आलों.

**चंडिराम** : मग ते दिल्लीच्या नायकिणीचं मीं गाणं करवलं होतं त्या वेळीं तुम्ही असालच !

**अरविंद** : असाल म्हणजे ! त्यावेळी तर मी तुमच्या मांडीला मांडी लावून बसलों होतों ना शेजारीं ? तुम्ही तर त्या दिवशी अगदीं बहारच उडवून दिली !

**चंडिराम** : म्हणजे, तो प्रकार अजून तुमच्या लक्षांत राहिला आहे वाटतं ! त्या दिवशीं चुकलंच आमचं तें ! भांगेच्या तारेंत फारच मूर्खपणा झाला त्या दिवशीं माझ्या हातून !

**अरविंद** : आमचीं तर हंसतां हंसतां पोटं दुखून आलीं ! तुम्हीं त्या बाईच्या—

**चंडिराम** : नका–नका, मेहेरबानी करून तुम्ही त्या प्रसंगाची आठवण करून देऊं नका ! मला लाजेनं अगदीं मेल्यासारखं होतं !

**अरविंद** : बरं तुमच्या त्या भानगडीचं काय झालं–मिटलं का तें ?

**चंडिराम** : म्हणजे त्या मुलीची–अरेच्या, म्हणजे तुमच्या कानापर्यंत आली का ती ?

**अरविंद** : असं काय करतां ? त्या वेळीं मी तिथंच नव्हतों का ! मी तर त्या मुलीच्या बापाची--

**चंडिराम** : बाप नाहीं भाऊ !

**अरविंद** : त्या भावाची समजूत घातली !

**चंडिराम** : जाऊं द्या ! त्या गोष्टीचं आतां नांव काढूं नका ! वीस हजाराला चट्टा बसला मला त्या भानगडीत !

**अरविंद** : मी होतो म्हणून थोडक्यांत आवरलं ! अरे, पण किती मूर्ख मी ! सरदारसाहेब, तुम्हीं प्रवासानं आधींच दमलेले आणि मी रस्त्यांतच तुम्हांला बोलत काय उभं केलं ? चला, आधीं आतां आमच्या घरीं चला—

**चंडिराम** : हें पहा–मी इथं दुसऱ्या एकाचा पाहुणा आहे–तिकडं मला गेलंच पाहिजे.

**अरविंद** : मला वाटलंच तुम्ही अशी थाप द्याल म्हणून ! पण मी तुमची कांहीं एक सबब ऐकणार नाहीं ! मी हात धरून ओढून नेईन तुम्हांला घरीं—!

**चंडिराम** : आतां तुम्ही असा आग्रहच धरलांत म्हणजे माझा नाइलाज आहे !

**अरविंद** : पाहिजे तर मी तुमच्या त्या गृहस्थाकडे निरोप पाठविण्याची व्यवस्था करतों.

**नागनाथ** : आतां तुमचे हे मित्रच भेटल्यानंतर मला निर्धास्तपणें जायला कांहींच हरकत नाहीं. मग, मी घेऊं तर आतां आपली रजा ?

**चंडिराम** : आणखी थोडीशी तुम्हांला तसदी द्यावी लागत आहे याबद्दल क्षमा करा. तिकडं स्टेशनवर माझं सामान पडलं आहे तें तेवढं कृपा करून पाठवून द्या. नाहीं तर मीच येतों तुमच्याबरोबर ! ( अरविंदास ) तुम्ही इथं उभे रहा ! मी हा आलोंच सामान घेऊन !

**नागनाथ** : ( अरविंदास ) सरदारसाहेबांची नीट काळजी घ्या हं ! या गांवचे लोक महा बदमाष आहेत.

**अरविंद** : त्याबद्दल तुम्ही निर्धास्त असा ! ( नागनाथ व चंडिराम जातात. ) इतका महामूर्ख माणूस मीं जन्मांत कधीं पाहिला नव्हता ! आणि–असल्या गाढवाच्या गळ्यांत माझ्या नेत्रेसारखं रत्न पडणार काय !

खरा सुधा मधुरा । विफला
सुरबाला तशि ती अंधाला !
कनकपात्र तें अनुचित श्वाना,
क्षीर मधुर का होय सूकरा ?

[ जातो.

## [ २ ]

कचेश्वराचें घर; किशा पुढें धांवतो आहे व मागून विद्यागौरी येते.

**विद्यागौरी** : चल चालता हो मेल्या—

**किशा** : पन बाईसाहेब—

**विद्यागौरी** : अगदीं अक्षर बोलूं नकोस ! बाहेर हो आधीं—

**किशा** : मी पाया पडतों—

**विद्यागौरी** : तुझं तोंड पाहायचं नाहीं मला ! आत्तांचें आत्तां काळं कर !

[ कचेश्वर येतो. ]

**कचेश्वर** : काय दंगा चालला आहे हा !

**विद्या** : तुम्हांला काय करायचंय ! तुमचा तिकडे काढा निवत असेल, जा !

**कचेश्वर** : अग, पण भांडतेस का त्या किशाशी ?

**विद्या** : मीं आज त्याला नोकरीवरून काढून टाकला आहे. ( किशास ) चल, चालता होतोस कीं नाहीं ?

**कचेश्वर** : अग, पण त्यानं केलं तरी काय ?

**विद्या** : म्हणजे ! त्याला उगीच काढून टाकायला मला काय वेड लागलं नाहीं तुमच्यासारखं !

**कचेश्वर** : मला लागू दे वेड—पण यानं अपराध तरी काय केला एवढा ?

**किशा** : मीं बी मघापासून त्येस्नी ह्येच इच्यारतोया !

**विद्या** : बोलूं नकोस जास्ती ! फाजील कुठला ! आज सहा महिने झाले, याला मी धुळाक्षर अन् बाराखड्या शिकवतें आहें ! पण मेल्याला एक अक्षर येईल तर शपथ ? जा, अगदीं उभा राहूं नकोस तूं इथं ?

**कचेश्वर** : एवढंच ना ? म्हटलं यानं आगबीग लावली आहे काय ?

**विद्या** : हो, आगच लागली आहे ! अंगाचा अगदीं भडका झाला आहे माझ्या ! परवां त्याला 'क'ची बाराखडी लिहायला सांगितली होती तर यानं 'फ'ची बाराखडी लिहून ठेवली ! असा तर मेला 'ढ' ! एवढा एरंडासारखा वाढला आहे ! याला दोन अक्षरं देखील वाचतां येऊं नयेत !

**कचेश्वर** : पण मी म्हणतों कीं, तूं कां विनाकारण रक्त आटवतेस ? किशाला लिहितां वाचतां येत नाही म्हणून सरस्वतीदेवीनें काय हंबरडा फोडला आहे स्वर्गात ! अग, हीं चाकर माणसं अशींच !

**विद्या** : असले निरक्षर नंदीबैल मुळींच नको आहेत माझ्या घरांत ! भाषा तर हा इतकी अशुद्ध बोलतो की अगदीं कान फुटताहेत असं वाटतं ! एवढा घोडा झालास पण म्हशीच्या पोराला काय म्हणतात हें देखील याला ठाऊक नाहीं !

**किशा** : शिंगरूं म्हनत्यात न्हव का ?

**विद्या** : बघा—बघा—ही तर ह्याची अक्कल !

**किशा** : न्हाइ—न्हाइ—करडूं म्हनत्याती—करडूं !

**विद्या** : आतां टाळकं फोडीन जास्ती बोलशील तर ! बेअकली मेला ! आणि परवां यानं काय केलं ठाऊक आहे ! ती शेजारची बाई सवाष्ण बोलावली होती ! तेव्हां याला म्हटलं, तिला जाऊन सांग कीं लवकर सोवळं नेसून या ! तर हा गाढव जाऊन सांगतो काय तिला, कीं बाईसाहेबांनी तुम्हांला लौकर सोवळं होऊन यायला सांगितलं आहे.

**कचेश्वर :** किशाची अक्कल मला काय माहीत नाहीं? सकाळीं गुडगुडीचा देखील यानं असाच प्रकार केला. विद्यादेवीच्या वाटेवरचे सराटे उचलण्याची देखील याची योग्यता नाही!

**विद्या :** आणि इथं तरी यानं कामाचे काय दिवे लावले आहेत! सगळ्या गांवचा कामचुकार! साऱ्या दिवसभर मागीलदारीं मोलकरणीच्या भोवती भोंवती फिरत असतो—

**किशा :** नाहीं—आईसाहेब, तुमच्या गळ्याशपथ—

**विद्या :** चल मेल्या! खोटं बोलूं नकोस! माझे डोळे फुटले नाहींत!

**कचेश्वर :** किशाला शिक्षण दिलंस त्याचा हा परिणाम! पुरे झाली ही कटकट! किशा, त्या चौकापर्यंत जाऊन तरी ये! हा नागनाथ कां अजून आला नाहीं? बारा वाजून गेले—अजून जहागिरदारसाहेबांचा पत्ता नाही!

**विद्या :** बसा जन्मभर वाट बघत त्यांची!

**कचेश्वर :** तूं नको आणखी माझं डोकं फिरवूंस! किशा, अरे तूं बघतोस काय? उचल पाय—अन् तें पायाला फडकं कसलं बांधलं आहेस?

**किशा :** पायाला वाईच पानथरी झालीया!

**कचेश्वर :** पायाला पानथरी! गाढवा! आणि नाकाला नारू नाही का झाला? चल निघ! (किशा जातो.) अन् हा डॉक्टर कुठं गेला आहे कुणाला खांदा द्यायला! मघापासून माझ्या छातीत काय वाजतंय कुणाला ठाऊक! किशा—ए — किशा—

[ जातो.

**विद्या :** अहाहा, काय मालक अन् काय नोकर! एक अकलेचा खंदक आणि दुसरा भुईकिल्ला! असल्या घरांत राहील तर बृहस्पतीला वेड लागेल आणि भीमाला देखील रोग जडेल?

[ नीरा पुढें व मागून पंडित भुलेश्वर पुस्तकांचा भारा घेऊन प्रवेश करतो.

**नीरा :** आई—आतां मारून तरी टाका आम्हांला? ओकारी आली मला यांच्या शिकवणीची! दोन तास झाले—माझ्या डोक्याच्या अगदीं चिंधड्या चिंधड्या झाल्या!

**भुलेश्वर :** आतां कांहीं फार नाहीं! एवढीं दोनचारच पुस्तकं वाचायचीं राहिलीं आहेत!

**नीरा** : आग लावा त्या पुस्तकांना! नाहीं तर त्यांचं सरण रचून मला जाळून तरी टाका!

**भुलेश्वर** : विद्येसंबंधीं असं बोलूं नये! विद्या ही देवी आहे!

**नीरा** : म्हणून मला तिच्यापुढं बळी देतां कीं काय? विद्या म्हणे देवी! आणि तुम्ही कोण देवीडॉक्टर!

**विद्या** : नीरा, फाजिलपणा पुरे झाला. पंडितजींना उलटून बोलतेस? लाज वाटते का कांहीं! चल बस इथं मुकाट्यानं. कशी शिकत नाहीस तें मी बघतें! पंडितजी, चालूं द्या हो तुमची शिकवणी! माझ्या तरी कानावर चार अक्षरं पडतील! अन् ती नेत्रा कुठं गेली?

**भुलेश्वर** : अहो, तिंनं माझ्या डोक्यावर मघाशीं ज्ञानकोश मारला! आणि मला वेडावण्या दाखवून ती पळून गेली! हें काय माझ्या डोक्याला टेंगूळ आलं केवढं!

**नीरा** : बरं झालं! तेवढा तरी तुमच्या डोक्याला ज्ञानाचा विटाळ लागला!

**विद्या** : आतां या कार्टींना करावं तरी काय? नेत्रा तर भारी बारंडली!

**भुलेश्वर** : हो—तर मघाशी मी यांना डोक्याच्या कवटीचीं माहिती सांगत होतों—

**नीरा** : झालं आतां हें ज्ञानाचं गुऱ्हाळ सुरू!

[ कानांत बोटें घालते.

**भुलेश्वर** : आपल्या शरीरांत एकंदर २०७ हाडं आहेत!

**विद्या** : अबब! इतकी! का हो, कुणी म्हणतात की आपल्या जिभेला देखील हाड असतं म्हणून!

**भुलेश्वर** : छे, बायकांच्या जिभेला मुळींच नसतं! असो, तर आतां पुढल्या खेपेला मी तुम्हांला श्वासनलिका, अन्ननलिका, फुप्फुस, पचनेंद्रियें, जठर, पानथरी स्वादुपिंड, यकृत, पित्ताशय व मलाशय याबद्दल माहिती सांगेन. आतां पदार्थविज्ञानशास्त्राकडे वळूं. पदार्थ हे द्रव—घन—वायुरूप असून परिमेयता, निर्भेद्यता, विभाज्यता, सच्छिद्रता, संकोच्यता व स्थितिस्थापकता हे त्यांचे सामान्य धर्म व वर्धमाणप्रेरणा, क्षीयमाणप्रेरणा, फलितप्रेरणा, घटकप्रेरणा आणि केंद्रापसारीप्रेरणा अशा त्यांच्या पांच प्रेरणा आहेत.

**नीरा** : अग आई! मेलें!

[ कानावर जोरानें हाताचे तळवे दाबते.

**भुलेश्वर** : आतां आपण रोमचा इतिहास वाचूं ! (वाचतो) "मेतेल्लूनें मारियूच्या मदतीनें युगुर्थ्याचा मोड केला. मग युगुर्थ्यानें मौरेतानीचा राजा बोक्क याच्याशीं सख्य बांधलें. मारीयूचा दुय्यम सुल्ला यानें ओलुम्पी लुटली. सुल्लयाच्या पश्चात् मेतेल्लू—कुलेल्लू—व लेपेदू—" अरे, हें पान फाटलं वाटतं ! बरं तर आपण आतां ग्रहगणितशास्त्राचा अभ्यास करूं !

**विद्या** : पंडितजी, तुमच्या ज्ञानाच्या तेजानें माझे डोळे दिपले !

**नीरा** : आणि माझे कान फुटले !

**भुलेश्वर** : (डोक्याला हात लावून) ही परमेश्वरी कृपा आहे ! सूर्य व मंगळ यामध्यें १४ कोटी १० लक्ष मैलांचें अंतर असून मंगळाचें विषुववृत्त त्याच्या कक्षेशीं २९ अंशानें कललेलें आहे.—आतां कळलं सारं !

**नीरा** : हो, कळलं तुमचं डोंबल !

**भुलेश्वर** : अरे हो, तुम्हांला सांगायला विसरलोंच कीं, आपला डांस असतो ना त्या डांसाची मादी एका तासांत १५३ अंडीं घालते !

**विद्या** : खरंच ? बाई, बाई, काय चमत्कार !

[चित्रा येते.

**चित्रा** : मास्तर ! इश्श, मला बाई लाज वाटते !

**विद्या** : तुझं काय काम आहे इथं चित्रा ?

**चित्रा** : मला किनई एक शंका विचारायची आहे ! विचारूं का मास्तर ! पण मला बाई लाज वाटते ! मास्तर, रात्रीं सूर्य कां हो उगवत नाही ?

**भुलेश्वर** : कोण लेकाचा म्हणतो रात्रीं सूर्य उगवत नाही ! उगवतो तर काय झालं ! पण रात्रीच्या अंधारामुळें तो दिसत नाहीं इतकंच !

**विद्या** : मला देखील ही शंका होतीच ! आतां कळलं !

**चित्रा** : आणखी मला एकच विचारायचं—विचारूं का ! पण मला किनई लाज वाटते—का हो, बायकांना मिशा कां नसतात ?

**विद्या** : चल, आचरट कुठली !

**भुलेश्वर** : नाहीं—नाहीं—विचार करण्यासारखा प्रश्न आहे हा ! बायकांना मिशा कां नसतात–( स्वगत ) आणि पुरुषांना मिशा कां असतात हें तरी मला कुठं अजून कळलं आहे ? ( उघड ) मी उद्यां विचार करून सांगेन !

**विद्या** : हं, चल जा घरांत !

**चित्रा** : मला बाई लाज वाटते ! पंडितजी, इश्श !

[ जाते.

**विद्या** : पंडितजी, माझ्या डोक्यांत किनई फार दिवस एक कल्पना घोळते आहे ! सांगू का ? (थांबून) म्हटलं आमची नीरा मी तुम्हांला द्यायचं ठरवलं आहे !

**नीरा** : (एकदम ओरडते) आई—

[ ओकारी आल्यासारखें करून निघून जाते.

**भुलेश्वर** : आपल्या का इच्छेबाहेर आहें मी ! मीही यासंबंधीं आपल्यापाशीं गोष्ट काढणारच होतों ! पण मला धीर होईना—आणि शिवाय काकासाहेबांचा विचार—

**विद्या** : त्यांच्या विचाराला कोण विचारतो आहे ! त्यांनी नेत्राचं लग्न ठरवलं असलं तर नीराचं लग्न मी ठरवणार ! त्यांना काय मी भितें आहें !

[ किशा हातांत पत्र घेऊन वाचीत येतो.

**किशा** : म्हनं मला वाचतां येत न्हाई !—पघा वाचतो की नाहीं तें ! ( वाचतो ) " र—वाजगी "

**विद्या** : ( पत्र पाहून ) अं, हें खाजगी काय आहे ?

**किशा** : खाजगी न्हाई—र—वाजगी आहे ! मला वाचतां येत नाहीं व्हय ?

**विद्या** : ( त्याच्या हातांतून पत्र हिसकावून घेऊन ) हें कोणाचं आणलं आहेस खाजगी पत्र ?

**किशा** : अहो, तें घेऊं नका—तें तुमचं न्हाई ! नीराबाईचं हाय ! त्येस्नी नेऊनशान् गुपचुप द्यायचं हाय अक्शी !

**विद्या** : पण दिलं कुणी तुला हें ?

**किशा** : आपल्या त्या दारावरल्या भय्यानं ! भय्या म्हंगाला मला, कीं किशा— खबरदार हें पत्र कुनाला दावशील तर ! अक्शी नीराबाईच्या हातामंदी नेवूनशान् दे आन् बिगीबिगी जबाब घेऊन ये ! अन् बाईसायबास्नी आन् धनीसायबास्नी तर बिलकूल पत्त्या लागून द्येवू नकोस !

**विद्या** : अरे मेल्या भय्या ! किशा, बाहेर दारापाशीं उभा रहा पाहूं ! कुणी आलं तर सांग मला ! ( किशा जातो. ) काय भानगड केली आहे या भय्यानं कुणास ठाऊक ! ( पत्र फोडून वाचते. ) अगबाई, अहो पंडितजी, हें बघितलंत् का ! हा भय्या म्हणजे कांही खरा भय्या नाहीं ! अहो, हा निरंजन !

**भुलेश्वर** : म्हणजे नीराबाईंना मागणी घालण्यासाठीं आला असतांना काका-साहेबांनीं ज्याला या घरांतून हांकून दिलं होतं तो निरंजन ?

**विद्या** : हो, तोच ! तरी मला वाटलंच ! मीं म्हटलं देखील यांना कीं हा भय्यासारखा दिसत नाहीं म्हणून ! तुम्ही नेमूं नका त्याला ! मला तर तो अगदीं रामोशासारखा दिसला; पण माझं ऐकायचं नाहीं ना ! आतां घ्या म्हणावं !

**भुलेश्वर** : तरीच तो माझ्या अंगावर धांवून आला मघाशी—

**विद्या** : काय आचरटासारखं पत्र लिहिलं आहे पहा मेल्यानं ! आणि रात्रीं दहा वाजतां त्यानं नीरेला दरवाजावर भेटायला बोलाविलं आहे ! म्हणजे तिला घेऊन तेथून परस्पर पळून जाण्याचा त्याचा बेत असेल ! बरं झालं त्या पोरटीच्या हाती हें पत्र पडलं नाहीं म्हणून–नाहीं तर ती फाजील कार्टी तिथं गेल्याशिवाय राहिली नसती ! थांब मेल्या, तुझं सगळं कारस्थान बाहेर फोडतें. पंडितजी, माझ्या डोक्यांत एक युक्ति आली आहे. ( भुलेश्वराच्या कानांत कांहींतरी कुज-बुजते. ) समजलं ! असं करायचं ! आणि त्याची अगदीं फटफजिती करायची !

**भुलेश्वर** : म्हणजे ! काय म्हणतां काय ! मी तिचं सोंग घेऊन तिथं जायचं; छान ! म्हणजे त्याची फटफजिती होण्याऐवजी माझीच फटफजिती व्हायची ! छट् ! हें आपल्याला नाहीं जुळायचं ! या भानगडीत मला प्रत्यक्षपणें भाग घेतां येणंच शक्य नाहीं ? अहो, त्या भय्याशीं गांठ आहे ना ! मारामारीपर्यंत पाळी यायची.

**विद्या** : अहो, खोटा भय्या आहे ना तो !

**भुलेश्वर** : अहो भय्या खोटा असला तरी त्याच्या हातांतला तो सोटा तरी खरा आहे ना ! आणि तशांत काशीला जाऊन आल्यापासून मीं मारामारी सोडली आहे ! पुरुषासारखा पुरुष असून मी बायकोचं सोंग घ्यायचं ! शास्त्रांत तर असं सांगितलं आहे—

**विद्या** : शास्त्र गेलं चुलींत ! व्यवहाराकडे लक्ष द्या ! यःकश्चित् मुलीचं काम करायला लाजतां ! भागूबाई कुठले ! बायकोचं काम करतां येत नाहीं तर बांगड्या भरा !

**भुलेश्वर** : अहो, पण मला तें बोलणं साधायचं नाहीं ! आमचा कंठ फुटलाय ना हा असा !

**विद्या** : त्याची तुम्हांला नको काळजी ! कसं बोलायचं न् काय करायचं तें मी तुम्हाला सगळं नीट शिकवीन !

**भुलेश्वर :** पण तें फाजीलपणाचं बोलणं जुळायचं नाहीं ना मला ! प्रेमाची भाषा करायची म्हणजे थोडंसं अश्लील बोलणं आलंच—तें नाहीं आपल्याला जमायचं !

**विद्या :** तुम्हांला नीरा पाहिजे ना—

**भुलेश्वर :** (हंसून) म्हणजे आतां काय प्रश्न आहे काय ?

**विद्या :** मग नीरा जर तुम्हांला हवी असेल तर मी सांगतें हें असं नाटक तुम्हांला करायला पाहिजे ! नाही तर मुकाट्यानें आपला रस्ता सुधारा—

**भुलेश्वर :** चमत्कारीक पेंच टाकलांत तुम्ही मला ! बरं आहे बुवा ! तुम्ही म्हणतां तर करायला पाहिजे हें ! बायको मिळणार असेल तर घटकाभर बायकोचं सोंग घ्यायला काय हरकत आहे ? पण हें सारं गुपचुप ठेवा—म्हणजे मला लाज वाटते ! आणि त्या नवीन आलेल्या डॉक्टरलाही मला वाटतं बरोबर घेतलेलं असावं ! हो, वेळ आहे—वखत आहे—एखाद पुरुष माणूस बरोबर असलं म्हणजे तितकं बरं !

**विद्या :** पुरुषमाणूस ! अहो, तुम्ही आहांत ना तिथं !

**भुलेश्वर :** ( डोकें खाजवीत ) हो—तें खरं—पण मी स्त्रीचं सोंग करणार आहे ना ? एका वेळी दोन कामं कशीं होतील माझ्या हातून ! हें पहा एवढं तुम्ही ऐका माझं ! तो डॉक्टर असूं द्या आपल्याबरोबर ! त्याचा पुष्कळ उपयोग होईल आपल्याला—

**विद्या :** बरं, तुम्ही म्हणतां तर डॉक्टरला घेऊं या कटांत ! पण त्याला या सगळ्या भानगडी सांगतां कामा नयेत ! चला, आपण आधी वर जाऊन या पत्राचा जबाब तर तयार करूं ! किशा—( किशा येतो. ) हें बघ, मी या पत्राचें उत्तर तुला लिहून देतें. तें त्या भय्याला नेऊन दे ! आणि काय सांगशील त्याला ?

**किशा :** कीं बाइसाहेबांनी उत्तर लिहूनशान् दिलंया म्हून—

**विद्या :** मेल्या, डोकं फोडीन असं सांगशील तर ! म्हणावं नीराबाईनं हें पत्राचं उत्तर लिहून दिलं आहे म्हणून ! चुकलास तर बघ !

**किशा :** हां हां ! आतां समदं ध्येनामंदी आलं !

[ सगळे जातात. एका बाजूनें भय्याचें सोंग घेतलेला निरंजन येतो. ]

**निरंजन :** या किशानं माझं पत्र नीराला नेऊन दिलं आहे कीं नाही कोणाला ठाऊक ! अजून कसा त्यानं जबाब आणला नाहीं ! दोन दिवस झाले, मला नीराचं ओझरतं दर्शन देखील झालं नाहीं ! पण मी हें सोंग घेऊन या ठिकाणीं आलों आहें याची तिला तरी काय कल्पना असणार ? या नागनाथानं मला इथं आणून सोडलं

आणि आपण मात्र कसल्या भानगडीत गुंतला आहे कोणास ठाऊक ? तें कांही नाहीं ! प्रणयाच्या सृष्टींत दुसऱ्याच्या पराक्रमावर यशाची आशा धरण्यांत काय अर्थ आहे ? प्रेमस्वरूप परमेश्वरा, आजच्या कार्यांत यश देणं हें केवळ तुझ्या हातीं आहे.

[ किशा हातांत पत्र घेऊन येतो.

**किशा** : ह्यो नीराबाईनं तुमच्या कागदाला जबाब दिला हाये !

**निरंजन** : ( चटकन् पत्र घेऊन ) ऐसा ! बहोत अच्छा ! किसीकू मालूम नही ना ये बात ?

**किशा** : छे छे, फकत मला अन्—न्हाई—न्हाई—अक्शी मलाच ठावं हाय ! म्हंजी नीराबाईना बी ह्ये ठावं न्हाई ! हा—हा—म्हंजी त्येना बी ह्ये ठावं हाय ! ( आंतून हांक येते. ) हा—आलों—आलों न्हव का !

[ जातो.

**निरंजर** : ( पत्र फोडून घाईघाईनें वाचतो ) अहाहा, माझ्या आनंदाला आतां पारावार नाहीं ! आतां रात्र केव्हां होते असं मला झालं आहे ! परमेश्वरा, माझ्या मार्गांत आतां मात्र आणखी संकटं आणूं नकोस !

[ जातो.

## [ ३ ]

एक शृंगारलेलें घर. अरविंद व चंडिराम प्रवेश करितात.

**अरविंद** : हें आमचं घर !

**चंडिराम** : वा, फारच सुरेख आहे कीं !

**अरविंद** : आतां पलीकडच्या खोलींत जाऊन तुम्ही कपडे उतरा. तोंपर्यंत मी बाबांना हांक मारतों. त्यांची पूजाअर्चा आत्तां संपलीच असेल ! आमच्या बाबांना तुमच्या घराण्याची इथ्थंभूत माहिती आहे !

**चंडिराम** : खरं कीं काय ?

**अरविंद** : आणि—आमची रेखा तर तुम्हांला बघून आनंदानं नाचायला लागेल !

**चंडिराम** : कोण रेखा ?

**अरविंद** : आमची धाकटी बहीण हो ! मी तिला नेहमीं सांगत असतों तुमच्या संबंधानं ! तिला कल्पनाही नसेल तुम्ही इथं आल्याची ! आमची रेखा म्हणजे नक्षत्रासारखी सुंदर आहे !

**चंडिराम** : मग तर तिला बघितलीच पाहिजे मला !

**अरविंद** : मी तिला आंत जाऊन सांगतों कीं जाफराबादचे जहागिरदार तुला बघायला बाहेर आले आहेत म्हणून !

**चंडिराम** : छे छे, असं भलतंच नका सांगूं तिला !

**अरविंद** : बाकी, तुम्हीं तिला कोणत्याहि अर्थी बघितलीत तरी ना नाही आमची ! बरं, कपडे तर काढा, मी बाबांना हांक मारतों ? ( चंडिराम जातो. ) बाबा, अहो बाबा—

[ नुकतीच पूजा करून उठलेल्या वृद्ध माणसाचें सोंग घेतलेला नागनाथ येतो.

**नागनाथ** : हा बघ आला तुझा बाप, ओरडूं नकोस !

**अरविंद** : अरे बापरे ! नागनाथ, काय झकास सोंग काढलं आहेस !

**नागनाथ** : हळू, केवढ्या मोठ्यानं बोलतोस ! तो तुझा बाप ऐकेल ना पलिकडचे खोलींत !

**अरविंद** : बाकीचीं सोंगं तयार आहेत ना आंत ?

**नागनाथ** : तूं दुसऱ्याची काळजी करूं नकोस ! आपलं स्वतःचं काम नीट कर. तो आला बघ जाफराबादी रेडा !

[ चंडिराम येतो

**अरविंद** : सरदारसाहेब, हे आमचे वडील ! बाबा, तुम्हीं यांना ओळखलंच असेल.

**नागनाथ** : म्हणजे, यांना मीं हातावर खेळवलेले आहेत लहानपणीं ! यावं, यावं, सरदारसाहेब ! वाहवा. याला म्हणतात योगायोग ! ( अरविंदास ) आतां तूं इथं उभा राहूं नकोस. आंतील व्यवस्था पहा सारी ! ( अरविंद जातो. ) तुम्हांला पाहून आनंद झाला आम्हांला अगदीं ! घ्या, हें आमचं देवीचं तीर्थ घ्या आधीं ?

**चंडिराम** : ( तीर्थ घेतो. ) आपल्याही भेटीचा अचानक योग जुळून आला !

[ पायां पडूं लागतो.

**नागनाथ** : छे, छे ! हें काय करतां ? तुम्ही आमच्या पाया पडायचं नाहीं !

**चंडिराम** : असं कसं म्हणतां ? आपण वडील आहांत, वृद्ध आहांत ! आपणांला आम्हीं आमच्या वडिलांसारखे समजतो !

[ पाया पडतो

**नागनाथ :** उठा, शतायुषी व्हा! तुमचे वडील माझे परम स्नेही होते! त्यांची आठवण झाली कीं अंतःकरण कसं भरून येतं!

**चंडिराम :** ( स्वगत ) यांचा आवाज आणि चेहेरा परिचयाचा वाटतो!

**नागनाथ :** आपले वडील वारले तेव्हां आपण बघा किती वर्षांचे होतां—

**चंडिराम :** चार वर्षांचा होतों मी त्या वेळी!

**नागनाथ :** चार नाहीं—मला वाटतं पावणेचार वर्षांचे असाल आपण त्यावेळीं! हो! त्यावेळी आम्ही जाफराबादेला आलों म्हणजे सहा सहा महिने आमचा मुक्काम असायचा तुमच्या वाड्यांत! आतां तुम्हांला तें कांहीं आठवायचं नाही! लहानपणीं आम्हीं तुम्हांला मांडीवर घेऊन तुमचे मुके घेतले आहेत. गालगुचे पण घेतले आहेत.

**चंडिराम :** लहानपणचं कांहीं आठवत नाहीं मला! आतां मला कळलं तुमचा चेहेरा इतका परिचयाचा कां वाटतो तें!

**नागनाथ :** तुमचे ते गांजेकस मामा अजून आहेत का हो शिल्लक?

**चंडिराम :** अरे वा, तुम्ही त्यांना चांगले ओळखतां असें दिसतें! ते गेल्याच वर्षी वारले!

**नागनाथ :** मग बरीच वर्षें जगले म्हणायचे ते! अन् तुमच्या त्या अक्कामावशी कशा आहेत हल्लीं!

**चंडिराम :** ( स्वगत ) चांगलीच माहिती दिसते यांना आमच्या मंडळीची!

**नागनाथ :** लहानपणापासून ती पोरगी भारी ढालगज आणि बडबडी! साऱ्या गांवच्या उलाढाली तिला! अजून देखील तिचा स्वभाव पहिल्याच सारखा असेल! कां, सुधारला आहे कांहीं?

**चंडिराम :** अगदीं नांव नाहीं!, उलट जास्तच झाला आहे. असा त्रास झाला आहे तिचा घरांत!

**नागनाथ :** बरं, तें राहूं द्या! तुम्हीं लग्न केव्हां करणार? तुमच्या एवढ्या मोठ्या जहागिरीला आणि वैभवाला मालकीण पाहिजे आतां!

**चंडिराम :** मी हल्लीं त्याच विचारांत आहे!

**नागनाथ :** उत्तम! अहो, हें तुमचं वय फार वाईट! तरुणपणांत एकटं राहणं म्हणजे गंधकाच्या घरांत जळती मशाल घेऊन फिरण्यासारखं आहे.

**चंडिराम :** तुम्हांला सांगायला हरकत नाहीं. माझं लग्न जवळ जवळ ठरलंच आहे म्हणा ना ?

**नागनाथ :** मनपसंत गोष्ट केलीत ही ! लग्न हें पुरुषांच्या अब्रूवरचं मोठं पांघरूण आहे ! तुमचं एकदां लग्न झालं म्हणजे मग लोक तिकडे बाहेर कांहीं का म्हणेनात—

**चंडिराम :** म्हणजे, लोक काय म्हणतात माझ्याबद्दल ?

**नागनाथ :** जाऊं द्या हो ! लोक आपल्या पाठीमागें काय बोलतात, तें आपण कधीं ऐकूं नये !

**चंडिराम :** पण, म्हणतात तरी काय लोक ?

**नागनाथ :** लोक काय म्हणणार ? ते का कधी बरं म्हणतात कोणाला ! येऊन जाऊन म्हणणार काय ते कीं जहागिरदारसाहेबांना प्यायचा नाद आहे—

**चंडिराम :** छे, छे, घेतलीच तर कधीं भांग घेतों मी—

**नागनाथ :** भांगच ना ? मग आतां पहा बरं लोक कसा विपर्यास करतात तें ! गुऱ्हाळांत माणूस बसलं तरी यांना गुत्त्यांत बसल्यासारखं दिसतं !

**चंडिराम :** हलकट आहेत लोक !

**नागनाथ :** आणखी समजा, मी म्हणतों कीं कधीं एखादे वेळीं तें घेतलें देखील—

**चंडिराम :** अहो, छे हो, मी जन्मांत कधी स्पर्श केला नाहीं त्याला !

**नागनाथ :** नाहीं पण—मी म्हणतों घेतलं एखाद्या वेळीं आपलं थोडंसं तें—श्रीमंतांना आणि जहागिरदारांना घ्यावंच लागतं कधीं कधीं तें—पण म्हणून लोकांच्या घशांत का ओकारी उठते ! आमचे पैसे आहेत—आम्ही पिऊं नाही तर गटारांत पडूं—लोकांचा काय संबंध ?

**चंडिराम :** नाहीं, पण साफ खोटं आहे तें !

**नागनाथ :** मागं तुम्हीं कधीं दिल्लीच्या का कुठल्याशा नायकिणीचं गाणं केलं होतं का ?

**चंडिराम :** ( स्वगत ) अरेच्या, यांच्याही कानापर्यंत हें येऊन पोहोचलं का ? ( उघड ) बरं मग, त्याचं काय ?

**नागनाथ :** नाहीं—नायकिणीचं गाणं तुम्हीं केलं म्हणून बिघडलं कांहीं नाहीं ! पण लोकांना काय तेवढंच फावतं ! त्या गाण्याचे वेळीं तुम्ही म्हणे पिऊन फारच—

**चंडिराम :** डांबीस आहेत लोक अगदी ! ( स्वगत ) लोकांना या बातम्या नेमक्या लागतात तरी कशा !

**नागनाथ :** परवां तर एक पाजी माणून गांवांत आपला खुशाल सांगत सुटला होता कीं, काय म्हणे जाफराबादच्या जहागिरदारानं एका मुलीलाच पळवून नेलं !

**चंडिराम :** हद्द झाली लोकांची या ! ( स्वगत ) चांगलीच प्रसिद्धी झालेली दिसते आमची या गांवांत ! आमच्या श्वशुरांच्या कानापर्यंत या बातम्या पोंहोंचल्या नसल्या म्हणजे मिळविली !

**नागनाथ :** आणि या साऱ्या भानगडीत म्हणे तुम्हांला वीस हजाराला चट्टा बसला !

**चंडिराम :** ( स्वगत ) अगदीं आंकडे देखील पाठ आहेत लोकांना !

**नागनाथ :** मी म्हणतों, आली असली एखादी मुलगी तुमच्याबरोबर पळून—

**चंडिराम :** नाही हो— अगदीं निखालस खोटं—

**नागनाथ :** किंवा मी म्हणतों, तुम्हीं तिला पळवली असली, तर लोकांना थोडाच गाडीभाड्याचा खर्च द्यावा लागतो आहे ? नाही तरी मी म्हणतों, की श्रीमंत लोकांनी पळवायचं कुणाला ? अहो, तेवढाच व्यायाम तरी घडतो त्यांना ! मी म्हणतों तुम्ही फार बरे !—तुमच्या वडिलांनी काय प्रकार केले होते माहीत आहे तुम्हांला ?

**चंडिराम :** नाहीं बुवा !

**नागनाथ :** कान करा इकडे !

[ त्याच्या कानांत सांगतो.

**चंडिराम :** ( एकदम दचकून ) आं ? काय म्हणतां ?

**नागनाथ :** अहो, एक नाहीं—दहा ! आम्ही होतों ना त्या वेळेला ! तुम्हीं त्यांच्या पासंगाला देखील पुरायचे नाहींत ! जाऊं द्या—लोकांच्या बडबडीकडे काय लक्ष द्यायचं !

[ रेखा लगबगीनें येते.

**रेखा :** बाबा—अहो बाबा—

[ चंडिरामाला पाहतांच ती एकदम थबकते व लाजल्यासारखी करते, आणि परत जाऊं लागते.

**नागनाथ** : अग ये रेखा—थांब, चाललीस कुठं ? लाजतेस काय ? हे बघ कोण आले आहेत पाहुणे आपल्याकडे ! ही आमची मुलगी बरं का.

**रेखा** : मी नाहीं जा बाबा—

[ नागनाथ तिला हातानें धरून आणतो.

**नागनाथ** : वेडी कुठली ! एवढे मोठे गृहस्थ आपल्याकडे आले आहेत आणि म्हणे, मी नाहीं जा ! सरदारसाहेब, या आमच्या मुलींत एक मोठा दोष आहे—

**रेखा** : बाबा, आतां मी तुमच्याशीं बोलायची नाहीं अं !

**चंडिराम** : मला तर यांच्यांत कांहींच दिसत नाहीं दोष !

**नागनाथ** : अहो, भारी लाजरी आहे ही ! अगदीं लाजाळूचं झाडच जसं कांहीं ! हिच्या अंगाला हात लावायची सोय नाहीं—

**चंडिराम** : मोठीच आपत्ती आहे ही म्हणायची !

**नागनाथ** : बघा, तुम्ही बोलायचा अवकाश कीं लाजली !

**चंडिराम** : मी कांहीं परका नाहीं !

**नागनाथ** : तिला माहीत नाहीं काय ? अहो, तिला सगळं कांहीं तुमचं ठाऊक आहे !

**चंडिराम** : ( घाबरून ) म्हणजे—?

**नागनाथ** : नाहीं—नाहीं—तुमचं 'तें' तिला कांहीं ठाऊक नाहीं ! तशी आमची रेखा फार भोळी आहे !

**चंडिराम** : ( स्वगत ) मग कांहीं हरकत नाही !

**नागनाथ** : रेखा, सरदारसाहेबांना जरा फोनो वाजवून दाखव पाहूं ! काय करीत बसली आहेत ही मंडळी आंत कोणास ठाऊक ! भारी उशीर करतात हे लोक !

[ जातो.

**रेखा** : आमच्या घरीं जेवायला नेहमीं असा उशीर होतो !

**चंडिराम** : पण मला भूक लागली नाहीं अजून ! तुम्ही जर इथं बसलांत तर मला दिवसभर जेवायला मिळालं नाहीं तरी चालेल !

**रेखा** : ( लाजून ) इश्श ! आपलं कांहीं तरीच—

**चंडिराम** : कां, राग नाहीं ना आला माझ्या बोलण्याचा ?

**रेखा** : हो, आला, आला बरं का राग मला !

**चंडिराम** : चुकलं बुवा आमचं !

**रेखा** ( मोठ्यानें हंसत ) कशी गंमत एका माणसाची !

[ हंसते.

**चंडिराम** : किती सुरेख हंसतां तुम्ही !

**रेखा** : तुम्ही तरी किती सुरेख बोलतां !

**चंडिराम** : तुमचा आवाज किती सुंदर आहे. एखादं गाणं म्हणा ना !

**रेखा** : इश्श, मला गळाच नाहीं.

**चंडिराम** : इतका सुंदर चेहेरा असलेल्या माणसाला गोड गळा नाहीं असं सांगितलं तर कोणाचा विश्वास बसेल का त्याच्यावर ? तें कांहीं नाहीं, म्हटलंच पाहिजे तुम्हीं एक गाणं !

**रेखा** : इतका आग्रहच करतां तुम्ही तर म्हणतें मी एक गाणं ! हसूं बिसूं नका अं !

[ म्हणते.

उपास मज लागला । सखे, बाई उपास मज लागला !

कांहींच नसे खायला,
केळीं नि खजुर आणिला;
अच्छेर दूध प्यायला, सखे बाई ! १

खारका मोजक्या दहा,
उकडले बटाटे सहा,
खिस नुसता केला पहा, सखे बाई ! २

वाडगा भरून लापशी,
घेतली पहा गोडशी;
वरि खाइन खिचडी तशी, सखे बाई ! ३

हा उपास मज भोंवला,
घाबरा जीव जाहला,
दहिंभात म्हणुनि चापला ! सखे बाई ! ४

**चांडराम** : ( टाळ्या वाजवात ) फारच छान. मग तुम्ही आमच्या जाफराबादला केव्हां येणार ?

**रेखा** : तुम्हीं आम्हांला बोलवलंत कुठं ?

**चंडिराम** : घरच्या मंडळींना बोलवायला का पाहिजे ?

**रेखा** : बरं तर, आम्हीं तुमच्या लग्नालाच येऊं तिकडे ! मग तर झालं ?

**चंडिराम** : ( स्वगत ) म्हणजे, माझ्या लग्नाची बातमी हिला कोणी सांगितली ?

**रेखा** : कसें लाजलांत ? आमच्यापासून चोरून ठेवतां नाहीं का ?

**चंडिराम** : छे, छे, भलतंच कांहीं तरी ! लग्नबिग्न कांहीं ठरलं नाहीं माझं !

**रेखा** : मग आंगठी दिसते आहे बोटांत ती !

**चंडिराम** : अहो, ती माझीच आंगठी आहे ! पांच हजार रुपये किंमत आहे तिची ! असली आंगठी कोण कुणाला द्यायला बसलं आहे ?

**रेखा** : ( चंडिरामाच्या हातांतली आंगठी पहात ) किती सुंदर आंगठी आहे ही !

**चंडिराम** : बघा, तुमच्या बोटाला येते का ? ( रेखा आंगठी बोटांत घालते. ) येते ना ? असूं द्या घटकाभर तुमच्या बोटांत ! वा, किती छान दिसते ही आंगठी तुमच्या बोटांत ! बरं, पण तुमचं लग्न केव्हां होणार तें तर आम्हांला सांगा.

**रेखा** : इश्श ! मला मुळीं लग्नच करायचं नाहीं ! एका सामुद्रिकानं मला सांगितलं आहे कीं, तुमचं लग्नच व्हायचं नाहीं मुळीं ! कां तर म्हणे माझ्या हातावर लग्नाची रेषाच नाहीं.

**चंडिराम** : छट् ! तो सामुद्रिक काय सांगतो ? त्याचं भविष्य सपशेल खोटं करून टाकणं हें माझ्या हातांत आहे ! बघूं तुमचा हात ! ( रेखाचा हात हातांत घेतो. ) किती सुंदर आहे हा हात !

**रेखा** : ( एकदम घाबरा चेहरा करून ) बाबा—दादा—अरे—धांवा—धांवा—अग आई ग—

[ चंडिरामाच्या हातावर मूर्छित पडते. चंडिराम भयभीत होतो.

**चंडिराम** : अरे बापरे. हें काय झालं ! आतां काय करावं ! ए रेखा, ऊठ ! छे; या कार्टीनं माझा सपशेल गळा कापला !

[ अरविंद एकदम आंत घुसतो.

**अरविंद** : हलकट माणसा, बेशरमपणाचा अगदीं कळस झाला ! अरे भार्गव—चिंतामणी—मनोहर,—धांवा—धांवा लौकर ! ठेव, ठेव खालीं तिला ! नाहीं तर

कसरत काय बोलता ! कृतघ्नपणाचा अगदी कळस केलास ! ज्यांच्या घरचं
अन्न खाणार होतास त्यांच्याच अब्रूवर विष ओकलास ! काळसर्पा—

[ तीनचार माणसें आंतून एकदम धांवून येतात.

भार्गव, तूं बाबांना हांक मार—नाहीं तर गेटावर जाऊन पोलिसालाच बोलावून आण !

**चंडिराम** : अहो ! मी तुमच्या पायां पडतों—माझं ऐकून घ्या आधीं ! मग पोलीसला बोलवा पाहिजे तर !

[ भार्गव जातो.

**अरविंद** : मनोहर, चिंतामणी, धरून ठेवा तुम्ही त्याला ! नाहीं तर पळून जाईल तो बदमाष ! आमच्या घरांत येऊन आमच्या मुलीची अब्रू घेतोस !

**चंडिराम** : अहो, काय बोलतां हें तुम्हीं ! मी तसल्यापैकीं नाहीं हो !

**अरविंद** : हात कलम करून टाकीन ! कुमारिकेकडे वांकड्या नजरेनें पाहणारे तुझे डोळे रक्तबंबाळ करीन ! ( रेखास ) ताई—ऊठ—ऊठ—घाबरूं नकोस ! आम्ही इथं तुझ्याजवळ आहोंत. ( रेखा हळू हळू शुद्धीवर येते व चंडिरामाला पाहून एकदम किंचाळते. अरविंद तिला आपल्याजवळ घेतो. ) ताई, भिऊं नकोस सांग, काय केलं या हरामखोरानं ?

**चंडिराम** : सांगा—सांगा रेखताई, देवाचं नांव घेऊन सांगा. अहो, मीं पुरुषाचा देखील हात धरला नाहीं चुकून आजपर्यंत कधीं, तर बाईचा हात कोठून धरणार !

**रेखा** : दादा, तूं ऐन वेळीं आलास म्हणून बरं ! नाहींतर या राक्षसानं माझी अब्रू घेतली असती आज इथं !

**अरविंद** : असल्या निमकहराम माणसाला मीं अतिथी म्हणून मोठ्या आदरानं घरीं आणलं ! परमेश्वरा, या जगांत कृतज्ञता म्हणून कांहीं पदार्थ आहे का रे ?

**चंडिराम** : अहो, तुमचीआमची इतक्या वर्षांची दाट मैत्री—तुम्ही नेहमी जाफराबादला यायचे—तुम्ही आम्हीं एकत्र जेवलों आहोंत—बसलों आहोंत—

**अरविंद** : तुझं तोंड देखील पाहिलं नाहीं मीं आजपर्यंत कधीं ! तुझ्यासारख्या हलकट माणसांशीं मी मैत्री करीत नसतों !

**चंडिराम** : तुम्ही आमच्या मामाला इतकं ओळखतां, मावशीला देखील ओळखतां—

**अरविंद** : तुझा मामा गेला बंबांत आणि मावशी गेली चुलींत.

**चंडिराम** : अहो, पण मी फार मोठा माणूस आहें—जहागिरदार आहें मी

**अरविंद :** परस्त्रियांच्या अब्रूचा अपहार करणाऱ्याच्या मोठेपणाला अन् जहागिरीला काय जाळायचं आहे ?

**रेखा :** दादा—मी नको नको म्हणत असतांना त्यांनीं माझ्या बोटांत ही आंगठी घातली !

**अरविंद :** बोल, आहे कीं नाहीं तुझ्या हलकटपणाचा हा धडधडीत पुरावा ?

**चंडिराम :** आतां सांगूं तरी काय कपाळ !

**रेखा :** घे ही आपली आंगठी परत !

**अरविंद :** देऊं नकोस त्याला ती ! नाहीं तर हा त्या आंगठींतली हिरकणी खाऊन जीव द्यायचा आणि आपल्यावर खुनाचा आरोप आणायचा !

**रेखा :** मला हा म्हणाला कीं आपण दोघं कुठं तरी पळून जाऊं ! मी म्हणालें—मी येणार नाहीं; तेव्हां तो म्हणाला मी तुमचा हात धरून तुमच्या बापादेखत जाफराबादला पळवून नेईन ! अन् असं म्हणून कीं नाहीं त्यानं माझा हात धरला, आणि——

[ एकदम हंबरडा फोडते. अरविंद तिला आपल्याजवळ घेऊन समजावतो.

**चंडिराम :** ( स्वगत ) काय निर्लज्ज पोरगी आहे ही ! आणि ही म्हणे लाजाळूचं झाड ! ( उघड ) अहो, मी तुमच्या पायां पडतों—काय वाटेल तें करा—पण मला पोलिसाच्या ताब्यांत देऊं नका ! मी पाहिजे तितके पैसे देतों पण माझ्या गळ्याला फांस लावूं नका !

[ फौजदाराचें सोंग घेतलेला नागनाथ व दोन शिपाई आंत येतात.

**नागनाथ :** प्रत्यक्ष परमेश्वर आला तरी आतां तुझ्या गळ्याचा फांस तुटणं शक्य नाहीं ! गुन्हा करून आणखी वर लांच देऊन सुटायला पाहतोस ? हवालदार, ठोका याच्या हातांत बिड्या !

**चंडिराम :** अहो फौजदारसाहेब, मी पायां पडतों, दया करा माझ्यावर !

**अरविंद :** फौजदारसाहेब, यांनीं आमच्या मुलीच्या अंगावर हात टाकून तिची अब्रू घेण्याचा प्रयत्न केला !

**नागनाथ :** फारच वाईट गुन्हा आहे हा ! याला निदान सात वर्षांचं तरी काळं पाणी मिळेल !

**चंडिराम :** काय सात वर्षांचं काळं पाणी ! ( बोटें मोजतो. ) एक—दोन—तीन—छे, निकालच लागला माझा ! आतां कसलं लग्न अन् कसलं काय !

**अरविंद** : साहेब, आजपर्यंत यानं पुष्कळ गुन्हे केले आहेत! एका गृहस्थाची मुलगी पळवून नेली आणि वीस हजार रुपये लांच देऊन ती भानगड मिटविली!

**चंडिराम** : आतां कशाला सांगतां आहांत तें!

**नागनाथ** : म्हणजे हा पक्का सरावलेला बेरड दिसतो आहे! बघूं रे, वर कर तुझा चेहेरा! अरे, हा तर तो बंगालमधून पळून गेलेला डाकू! कसा नेमका सांपडला इथं! एक लाख रुपये बक्षिस लावलं आहे याला पकडण्याबद्दल!

**चंडिराम** : अहो, काय म्हणतां काय! मी जाफराबादचा जहागिरदार आहें! बंगाल बिंगाल काय आहे हें मला माहितसुद्धां नाहीं!

**नागनाथ** : हा उत्तर हिंदुस्थानांत बोका—इ—बंगाल म्हणून प्रसिद्ध आहे! हा नाना तऱ्हेचीं सोंगं घेतो आणि चांगल्या चांगल्या लोकांच्या घरांत शिरून त्यांच्या बायका नि मुली पळवतो!

**अरविंद** : भयंकरच माणूस आहे हा!

**रेखा** : अगदीं मोठ्या संकटांतून वांचलें मी आज?

**चंडिराम** : (स्वगत) एखादं भयंकर स्वप्न तर मला पडलं नाही! (उघड) अहो, मला आतां एकंदर शिक्षा होणार तरी किती आणि कसली!

**नागनाथ** : काळं पाणी आणि फांशी अशा दोन्ही सजा मिळतील तुला! आधीं फांशी देतील आणि मग तुला काळ्या पाण्यावर पाठवतील!

**चंडिराम** : फौजदारसाहेब, अहो दया, माया, कींव, करुणा कांहीं आहे कीं नाहीं तुम्हांला! पाहिजे तर माझ्या जहागिरीची खिरापत करून ती तुम्हां सर्वांना वांटायला मी तयार आहें! पण मला वांचवा! तुमचे हे उपकार मी निदान दोन चार जन्मांत तरी खास फेडीन!

**अरविंद** : फौजदारसाहेब! मला वाटतं अब्रूच्या दृष्टीनें असले खटले कोर्टांत नेणं बरं नाहीं.

**नागनाथ** : खरं आहे आपलं म्हणणं! हें बघ, ए बोका—इ—बंगाल, एका अटीवर मी तुला आतां सोडून द्यायला तयार आहें. मी सांगतों तसं मला एका कागदावर लिहून दे.

**चंडिराम** : सगळ्या जगाचं खरेदीखत लिहून द्यायला मी तयार आहें. सांगा, काय लिहूं?

**नागनाथ :** चल, घे कागद, बस इथं—हा घे टांक—लिही—( नागनाथ सांगतो व चंडिराम लिहितो. ) " बोका—इ—बंगाल नांवाचा जो एक दरोडेखोर आहे तो मीच आहे—"

**चंडिराम :** अहो, मी नाही तो !

**नागनाथ :** लिही मुकाट्यानं ! का पाठवूं काळ्या पाण्यावर आणि फांशीला ! ( चंडिराम पुन्हा लिहूं लागतो. ) " मीं आतांपर्यंत एकंदर सात लग्नें केलीं आहेत. त्यांपैकीं तीन बायका गळा दाबून ठार मारल्या. दोघींचा कडेलोट करून टाकला. एकीला विषप्रयोग केला. एक अद्यापि हयात आहे ! मुलीबाळी आतांपर्यंत किती पळविल्या त्याची खानेसुमारी करतां येत नाहीं ! "—बस्स ! कर खाली सही ! चल हो आतां चालता ! आणि फिरून या गांवांत दिसलास तर पाठवीन काळ्या पाण्यावर ! चल जा—ए, कपडे घेऊन जा—

[ अरविंद आंतून कपडे आणून त्याच्या अंगावर फेंकतो.

**चंडिराम :** ( स्वगत ) प्राणही वांचले आणि कपडेही मिळाले ! अब्रू गेली थोडी, पण तेवढी अब्रू जायचीच जगांत ! ( उघड ) नमस्कार मंडळी !

**नागनाथ :** चले जाव !

[ पिस्तूल वाजवतो. चंडिराम पळून जातो. सगळी मंडळी मोठमोठ्यानें हंसूं लागतात.

**नागनाथ :** ( चंडिरामनें लिहिलेला कागद अरविंदास दाखवीत ) मेहेरबान, ही म्हटलं तुमच्या आणि नेत्रेच्या लग्नाची आमंत्रणपत्रिका !—बोका—इ—बंगाल की जय !

**अरविंद :** सलाम फौजदारसाहेब ! कमाल केलीत तुम्हीं !

**नागनाथ :** ( रेखेच्या पाठीवर थाप मारून ) माझ्यापेक्षां या बापूचे आभार मान आधीं ! बोल, असला स्त्रीपार्टी असल्यावर स्त्रियांचीं कामं स्त्रियांनींच करावींत असं म्हणायचं कोणाला तोंड आहे ?

[ सगळे हंसतात. पडदा पडतो.

●

# ३

कचेश्वरपंतांच्या वाड्याबाहेरचें फाटक. रात्रीची वेळ. भय्याचें सोंग घेतलेला निरंजन इकडे तिकडे पाहात चोरट्या पावलानें प्रवेश करतो.

**निरंजन** : ( मागें घराकडे पाहात ) आंत अगदीं सामसूम आहे. दिवसभर ही मंडळी जीव तोडून भांडतात आणि लवकर झोंपी जातात ! ही गोष्ट माझ्या पथ्यावर पडली आहे ! पण अजून नीरा कां आली नाहीं ? हीं कोणाचीं पावलं वाजताहेत ! होय—नीराच ही !—( अंगावर काळा बुरखा घेतलेला भुलेश्वर दबकत दबकत प्रवेश करतो. पाठीमागें अरविंद व विद्यागौरी येऊन गुपचुप उभीं राहतात. ) नीरा—

**भुलेश्वर** : ओरडूं नकोस मोठ्यानं !

**निरंजन** : कोणी जागं तर नाहीं ना घरांत !

**भुलेश्वर** : नाहीं, कोणी जागं नाहीं भय्या !

**निरंजन** : आतां मला भय्या कां म्हणतेस नीरा ?

**भुलेश्वर :** मीं तुला खऱ्या नांवानं हांक मारली आणि ती कुणाला ऐकूं गेली तर ! छेः, नकोच तें !

**निरंजन :** नीरा–लाडके ! किती प्रेम आहे तुझं माझ्यावर !

**भुलेश्वर :** आणि शिवाय मला किनई भय्या हें नांव फार आवडतं ! आतां मी तुला जन्मभर भय्या म्हणूनच हांक मारणार !

**निरंजन :** आणि मी देखील भय्यासारखीच तुझी तात्रीलदारी पत्करून जन्मभर तुझी एकनिष्ठपणें सेवा करीत राहणार !

**भुलेश्वर :** किती धाडसी आहेस तूं भय्या !

**निरंजन :** तुझ्या प्रेमानं मला धाडसी बनवलं ! प्रेमामुळं मुर्दाडाला देखील मर्दांची वीरश्री फुटते !

**भुलेश्वर :** तूं वेष बदलून या घरांत आला असशील याची मला कल्पना देखील नव्हती ! मी आपली एकसारखी इकडे तुझी आठवण करीत बसलों होतों— नाहीं–बसलें होतें !

**निरंजन :** खरंच, तूं माझी इतकी आठवण करीत होतीस ? नीरा, त्या दिवशीं या घरांतून बाहेर पडल्यापासून मी देखील तुझ्या नांवाची रात्रंदिवस जपमाळ घेऊन बसलों आहें ! तूं दृष्टीस पडावी, अथवा तुझं ओझरतं दर्शन तरी घडावं, तुझ्या मंजुळ भाषणाचा गोड नाद माझ्या कानावर पडावा, म्हणून मीं आतां-पर्यंत किती धडपड केली असेल–पण व्यर्थ ! शेवटीं हें सोंग घेऊन मीं या घरांत प्रवेश मिळविला. पण इथं येऊन दोन दिवस होत आले तरी मला तुझी अस्पष्ट आकृति देखिल पाहायला मिळाली नाहीं ! नीरा, आतां दूर कां ? ये, अशी जवळ ये ! बघूं दे मला तुझा चेहरा ! अजून हा बुरखा तोंडावर कशाला ठेवला आहेस ?

**भुलेश्वर :** एवढ्या अंधारांत तुला माझा चेहरा कसा दिसणार !

**निरंजन :** प्रेमाच्या आंधळ्या दृष्टीला काळ्याकभिन्न काळोखांतहि आपली प्रेमवस्तु सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसते ! प्रेम हें मांजरासारखं चोरट्या पावलांनीं चालतं आणि तेजस्वी बुबुळांनी अंधारांतही बघूं शकतं ! बाजूला घे तो बुरखा !

**भुलेश्वर :** मला तुझ्या या दाढीमिशांचं भारीच भय वाटतं !

**निरंजन :** मला वाटलं बायकांना पुरुषांच्या दाढीमिशा फार आवडतात ! म्हणजे खोटंच का तें ?

**भुलेश्वर :** भय्या, तूं माझ्यावर इतकं प्रेम करतोस ! आणि माझंही तुझ्यावर किती प्रेम आहे ! पण—

**निरंजन :** पण–! पण काय नीरा ?

**भुलेश्वर :** भय्या, अंतःकरण अतिशय कठोर कर आणि मग मी काय सांगतें तें ऐकायला तयार हो ! भय्या, मला तुझ्याशीं लग्न करतां येणं शक्य नाहीं !

**निरंजन :** हेच–हेंच मला सांगण्यासाठीं तूं इथं आलीस ? तरी मला वाटलंच कीं आज तुझ्या आवाजांत एकदम इतका फरक कसा झाला ? नीरा, तुझ्या कोमल अंतःकरणांत इतकी निर्दयता कोठून आली ?

**भुलेश्वर :** पण मी तरी काय करूं ! माझा अगदीं नाइलाज झालाय ! माझ्या आईनं माझं लग्न त्या पंडित भुलेश्वराशीं ठरवलं आहे !

**निरंजन :** कोण पंडित भुलेश्वर ? म्हणजे फाटक्या पुस्तकाच्या गोण्या पाठीवर घेऊन उगाच इकडून तिकडे फिरणारा तो निर्बुद्ध नंदीबैल! त्याच्याशीं तुझं लग्न ठरलं आहे ? हें जर मला आज सकाळीं ठाऊक असतं तर मीं त्याची कबरच बांधली असती दरवाजांत ?

**भुलेश्वर :** (स्वगत) अरे बापरे—

**निरंजन :** काय म्हणालीस !

**भुलेश्वर :** अग आई ग ! भय्या, तुझं जर माझ्यावर खरं खरं प्रेम असेल तर तूं या पंडित भुलेश्वराच्या केंसालाही धक्का लावतां कामा नयेस !

**निरंजन :** केंसालाही धक्का लावतां कामा नये ? माझ्या मार्गांत तो जर आडवा येईल तर त्याच्या टाळक्यावरचा एक केंस देखील ठेवणार नाहीं मी !

**भुलेश्वर :** पंडित भुलेश्वर फार चांगला माणूस आहे हो ! आणि विद्वान् तर किती ! विद्वत्ता म्हणजे पाणी भरते आहे त्याच्या घरीं !

**निरंजन :** ठाऊक आहे ! एखाद्याच्या घरीं पाणी भरण्याइतकी देखील विद्वत्ता नाहीं त्याच्याजवळ ! आतां जर तो या ठिकाणीं असता तर त्याच्या डोक्याचा नारळ इथल्या इथं फोडून आंत विद्वत्तेचं पळीभर देखील पाणी नाहीं हें मीं प्रत्यक्षच तुला दाखवलं असतं !

**भुलेश्वर :** हें पहा, पंडितजीसंबंधीं असं बोललेलं मला मुळींच खपायचं नाहीं हं !

**निरंजन :** नेहमीं तर तूं त्याची निंदा करतेस ! आणि आजच तुला हा प्रेमाचा पान्हा कोठून फुटला ! एकूण तुला त्यानं चांगलंच भारून टाकलेलं दिसतंय !

**भुलेश्वर :** तसं कांहीं नाहीं ! पण आईनं ठरविलेलं लग्न मला कसं मोडतां येईल ?

**निरंजन :** कसं माडता येईल म्हणून काय विचारतेस ? धडधडीत तुझ्या मनाविरुद्ध होत असलेलं हें लग्न तूं उघड्या डोळ्यांनीं होऊं देणार ? नीरा, मुलामुलींच्या मनाविरुद्ध लग्न ठरविण्याचा प्रत्यक्ष त्यांच्या आईबापांना देखील आधिकार नाहीं ! तुझ्या आईला काय अक्कल आहे ? तिजवर म्हाताऱ्याशीं लग्न करून आपल्या संसाराचं वाटोळं केलं तसं तुझं करायचा तिचा विचार असेल झालं !

[ पाठीमागें विद्यागौरीचा चेहेरा 'प्रेक्षणीय' होतो.

**भुलेश्वर :** माझी आई अतिशय चांगली आहे !

**निरंजन :** तें दिसतंच आहे ! किती केलं तरी. ती तुझी सावत्र आई ! तिला काय तुझी माया असणार ! खरं सांगूं ! तुझ्या आईसारखी भांडखोर, फाजील आणि तोंडाळ बाई या जगांत कुठं पाहिली नसेल !

**भुलेश्वर :** किती मोठ्यानें बोलतोस ! ऐकूं जाईल ना तिला तिकडे !

**निरंजन :** जाऊं दे गेलं तर ! तुझ्या आईच्या बापाला देखील मी आतां भ्यायचा नाहीं ! तिच्या पाठीमागंच बोलतों असं नाही ! ती जर या ठिकाणीं आतां हजर असती तर तिच्या तोंडावर देखील शिव्या द्यायला मी कमी करायचा नाहीं !

**भुलेश्वर :** जाऊं दे ना तें !

**निरंजन :** आतां जाऊं दे कसं ! तुला खरं वाटायचं नाहीं मीं सांगितलं तर ! पण तुझ्या आईनं आतांपर्यंत काय काय भानगडी केल्या आहेत त्याचा खडा न् खडा इतिहास लिहिलेला आहे मजजवळ ! उगाच सोंग कशाला दाखवतेस तिला म्हणावं ! तुझे वडील फार भोळे. मी जर त्यांच्या जागीं असतों तर असल्या बायकोला केव्हांच घरांतून हांकून दिली असती !

**भुलेश्वर :** उगीच नको सांगूं कांही तरी ! माझी आई तसल्यापैकीं नाहीं बरं का !

**निरंजन :** मग आतां स्पष्टच सांगतों ! ज्या पंडित भुलेश्वराशीं तुझ्या आईनं तुझं लग्न ठरवलं आहे त्या पंडित भुलेश्वराचा आणि तुझ्या आईचा—आतां अधिक स्पष्ट काय सांगूं कपाळ ! यांत काय समजायचं असेल तें समज !

**भुलेश्वर :** अगदीं साफ साफ खोटं आहे हें ! उगीच वाटेल तें सांगूं नकोस मला !

**निरंजन :** तूं वाटेल त्याला गांवांत जाऊन विचार ना ! मी पदरचं थोडंच सांगतों !

**भुलेश्वर :** पंडित भुलेश्वरासंबंधीं आणि माझ्या आईसंबंधीं फिरून असं बोललांत तर मी अशीच्या अशी चालती होईन !

[ जायला लागते.

**निरंजन :** तर तर, तुला मीं इथून जाऊं दिलं तर चालती होशील ना !

**भुलेश्वर** : म्हणजे—तूं मला अडवशील कीं काय ?

**निरंजन** : म्हणजे, शंका वाटते की काय ? तूं जर बऱ्या बोलानं माझ्याबरोबर आली नाहींस तर तुझा हात धरून घेऊन जाईन इथून ! पुढची सारी व्यवस्था मीं आधींच करून ठेविली आहे ! प्रेमाच्या सृष्टींत असली दंडेलशाही मंजूर आहे ! आजच्या आज सोक्षमोक्ष करून टाकण्याचं मीं ठरवलं आहे ! ये, अशी जवळ ये ! अशी—रागावतेस काय ? हृदयेश्वरी, तुला घट्ट मिठी मारून, हृदयाशीं कवटाळून धरावं असं मला वाटूं लागलं आहे ! आज तुझ्या स्वभावांत इतका बदल कसा झाला ?

**भुलेश्वर** : अग बाई ! आतां तर तुम्हीं अगदीं ताळच सोडलांत ! व्हा—दूर व्हा ! माझ्या अंगाला हात लावूं नका—

**निरंजन** : नाहीं—लाडके, तूं कांहीं म्हणालीस तरी माझ्या एकनिष्ठ प्रेमाचं गोड बक्षीस मी तुझ्यापासून हक्कानं हिरावून घेतल्यावांचून कधींही राहणार नाही !

[ तिचा हात धरतो.

**भुलेश्वर** : धांवा, धांवा, मेल्यानं माझा हात धरला !

[ मागून विद्यागौरी हातांत काठी घेऊन धांवत येते.

**विद्या** : गोड बक्षीस पाहिजे काय ? हें घे मेल्या तुझ्या प्रेमाचं गोड बक्षीस ! डॉक्टर, धांवा—

**निरंजन** : अरे बापरे ! हें कोण—?

**विद्या** : ही तुझी सासू ! आणि (भुलेश्वराचा बुरखा काढून) ही बघ तुझी हृदयेश्वरी !

**निरंजन** : कोण भुलेश्वर—! हरामखोरा, अशा रीतीनं मला फसवतोस काय ?

[ त्याच्या अंगावर धांवून जातो.

**भुलेश्वर** : धांवा— धांवा— मेलों— दरवडा— आग— खून— कत्तल— धरणीकंप—प्रलयकाळ !

**अरविंद** : बदमाष, चल हो मागं !

**निरंजन** : घात झाला ! आतां मात्र येथून पोबाराच केला पाहिजे !

[ निरंजन पळूं लागतो, तोंच अरविंद त्याच्या कमरेला मिठी मारतो. दोघांची मारामारी जुंपते. अरविंदाच्या हातांत निरंजनाची दाढी येते व अरविंदाचा चष्मा निरंजनाच्या हातांत येतो. इतक्यांत एकदम उजेड होतो.

**विद्या** : धांवा, धांवा लौकर, चोर सांपडला !

**अरविंद** : कोण निरंजन !

**निरंजन** : कोण अरविंद !

**विद्या** : अग बाई, अरविंद का हा ? डॉक्टर नव्हे तर ! बरं झालं, दुसराही चोरं सांपडला ! अरे मेल्यांनो—

**अरविंद** : झालं, निकाल लागला. आतां दोघंही सपशेल मेलों !

[ कचेश्वर, नागनाथ, नेत्रा, नीरा, चित्रा व किशा येतात.

**कचेश्वर** : चोरी—आग—दरवडा—काय भयंकर प्रकार आहे हा ? कोण विद्या ? तूं कशाला आली आहेस इथं ? ( भुलेश्वरास ) आणि हा बहुरूपी कोण ?

**भुलेश्वर** : ( तोंड फिरवून ) इश्श !

**कचेश्वर** : इश्श ! पंडितजी ! काय हो, पुरुषासारखे पुरुष असून ही भलतीच अवदसा काय आठवली तुम्हांला ! आणि हा कोण ? डॉक्टर !

**विद्या** : डॉक्टर नव्हे, अरविंद आहे हा ! नीट डोळे उघडून पहा ! आणि हा भय्याचं सोंग घेऊन तुमच्या घरांत राहिलेला निरंजन ! एकाच सांपळ्यांत हे दोन उंदीर सांपडले !

**कचेश्वर** : कोण हा अरविंद ? आणि हा निरंजन ? काय म्हणतेस काय ?

**नेत्रा** : अग बाई, अरविंद !

**नीरा** : कोण निरंजन !

**चित्रा** : इश्श ! डॉक्टर !

**कचेश्वर** : चला व्हा कारट्यांनो बाजूला ! खबरदार पुढं जाल तर ! मारीन एकेकीच्या गालफडांत ! माझं घर शुद्ध पागलखाना झाला आहे अगदीं !

**विद्या** : स्वःतला अक्कल नाहीं तर दुसऱ्याला तरी विचारीत जावं ! माझ्या हातांत तें पत्र सांपडलं म्हणून ! नाहीं तर या बदमाषानं आपल्या नीरेला भरल्या घरांतून पळवून नेलं असतं !

**कचेश्वर** : काय ? नीरेला पळवून नेण्याचा का या हलकट पंडिताचा बेत होता ? तरी पहिल्यापासून मी सांगत होतों की, हा अत्यंत पाजी माणूस आहे ! हरामखोर—

**भुलेश्वर** : अहो, मी नाहीं ! मला काय बोलतां ? या लोकांचा कट होता !

**विद्या** : छान ! म्हणजे चोर सोडून संन्याशाला सुळीं ! अहो, पंडितजी होते म्हणून तर यांचं बेंड बाहेर फुटलं ! नाहीं तर या निरंजनानं नीरेला खास पळवून नेली असती आज ! आणि तुम्ही पडलां होता तिकडे डाराडूर घोरत ! काय रे ए रामोशा, आतां करतोस कां नाहीं सगळं कबूल ! आतां का दांतखिळी बसली !

**निरंजन** : नाहीं बाईसाब, सब झूट है—

**नागनाथ** : अहो भय्याजी, आतां दाढीमिशा उडाल्या, आतां हिंदुस्थानी भाषेचे कशाला हाल करतां आहांत विनाकारण!

**विद्या** : आणि काय रे ए निर्लज्जा, मी भांडखोर, फाजील आणि तोंडाळ बायको आहें काय रे!

**निरंजन** : म्हणजे—मागून तें तुम्हीं सारं ऐकलं वाटतं! अहो—नाहीं—तें साफ खोटं!

**कचेश्वर** : कोण! हा तुला असं म्हणाला?

**विद्या** : हो!

**कचेश्वर** : मग यांत खोटं काय आहे? एवढं मात्र हा खरं बोलला!

**विद्या** : पुरे झाला फाजीलपणा तुमचा!

**भुलेश्वर** : (निरंजनाकडे बोट दाखवून) आणि हा पाजी माणूस—नागनाथ त्याला आवरून धरा—हा पाजी माणूस मला बैल म्हणाला काकासाहेब!

**कचेश्वर** : काय तुम्हांला हा बैल म्हणाला? काय गाढव माणूस आहे हा! टोणग्याला बैल म्हणतो!!

**विद्या** : आणि लग्नाच्या पूर्वी मीं सतरा भानगडी केल्या आहेत काय रे? (वेडावून) म्हणे माझ्याजवळ खडा न् खडा इतिहास आहे लिहिलेला—काढ, काढ, तो तुझा इतिहास! नाहीं तर रंगवते तुझ्या गालफडावर चांगला शिलालेख!

**कचेश्वर** : म्हणजे लग्नाच्या पूर्वी कसल्या भानगडी केल्या आहेत आमच्या सौभाग्यवतीनं? ही भानगड मला कळलीच पाहिजे सारी!

**निरंजन** : अहो, तें उगीच कांहीं तरी—

**विद्या** : आतां कां घाबरलास? माझ्या तोंडावर शिव्या देणार होतास ना? मग आतां कां बत्तीशी मिटली तुझी? आणि पंडित भुलेश्वरासारख्या पवित्र माणसाचा आणि माझा घाणेरडा संशय घेतांना तुझी जीभ झडून कशी पडली नाहीं?

**निरंजन** : आतां काय सांगावं—अगदीं—अगदीं खोटं तें—

**कचेश्वर** : अशी भानगड आहे काय? तरी म्हटलं आज सकाळीं मी याला हांकून देत होतों, तेव्हां ही त्याला ठेवून घेण्याचा हट्ट कां धरून बसली होती!

**विद्या** : पुरे झाली चेष्टा! (निरंजनास) माझ्या जागीं जर दुसरी कोणी असती तर तिनं तुझ्या नरडीचा चावाच घेतला असता चांगला! काय म्हणे तिजवर थेरड्याशीं लग्न करून मीं माझ्या संसाराचं वाटोळं केलं आहे!

**कचेश्वर :** हरामखोरा, असं बोललास काय! मग याचं थोबाडच फोडायला पाहिजे! मला तिजवर थेरडा म्हणतोस! बोल, थेरड्यासारखा दिसतो आहे काय मी!

**विद्या :** नाहीं, अगदीं तारुण्याचं बाळसंच चढलं आहे गालावर!

**कचेश्वर :** इतका सकाळ संध्याकाळ काढा घेतों आहे तो काय फुकटचा काय? तें कांहीं नाहीं! आतां यांचा पुरता निकालच लावून टाकला पाहिजे! या दोघांना मीं त्या घरांतून लाथ मारून घालवून दिलं तरी यांचे डोळे अद्यापि उघडल्यासारखे दिसत नाहींत! काय भयंकर कारस्थान रचलं होतं या बदमाषांनीं माझ्या घरांत! म्हणजे मला विष देऊन मारून टाकण्यासाठींच हा पाजी माणून डॉक्टरचं सोंग घेऊन या घरांत आला असावा, असं मला वाटूं लागलं आहे!

**अरविंद :** तुमच्या हातीं सांपडलों आहे म्हणून वाटेल तो संशय घेतां का काय?

**कचेश्वर :** आणि एवढ्यांतूनही मी जर यदाकदाचित् वांचलों असतों—आमच्या काढ्याच्या सामर्थ्यावर—तर माझा कपाळमोक्ष करण्यासाठीं हा दुसरा डाकू भय्याचं सोंग घेऊन दरवाजांत उभा होताच—छान—!

**निरंजन :** आतां काय बोलाल तेवढं थोडंच आहे!

**कचेश्वर :** मोठंच गंडांतर टळलं म्हणायचं आज!

**विद्या :** माझ्या पायां पडा आधीं! मी आणि पंडितजी होतों म्हणून तुम्हीं या कटांतून वांचलांत!

**कचेश्वर :** मला तर तुमचं दोघांचंही या कारस्थानांत अंग दिसत आहे!

**विद्या :** तुमच्या कृतघ्नपणाची अगदीं कमाल झाली!

**नागनाथ :** छे छे, काकासाहेब, तुम्हीं यांचा संशय घेतां—थोड्या वेळानं तुम्ही माझा देखील संशय घ्याल!

**कचेश्वर :** मग बायकासारखा बुरखा घेऊन हा अकलेचा पंडित इथं कशाला आला!

**विद्या :** कशाला म्हणजे? नीरेचं सोंग घेऊन हे इथं आले म्हणून तर या भय्याचं बेंड बाहेर फुटलं!

**कचेश्वर :** अस्सं! मला वाटलं पंडितजींचा आणि तुझा पळून जाण्याचा विचार होता कीं काय!

**विद्या :** तुमच्या बेशरमपणापुढं अगदीं हात टेकले! तुम्हांला संशय येत असेल तर तुम्हींच अरविंदाला विचारा!

**कचेश्वर :** त्याला काय विचारा ? तो आतां चांगलाच हातांत सांपडला आहे ! तो काय वाटेल तें सांगेल ! नागनाथ, या दोघांना आत्तांच्या आत्तां चौकीवर नेऊन पोलिसाचे ताब्यांत दे !

**नागनाथ :** तुम्हीं अगदीं निर्धास्त असा ! यांच्या चांगल्या मुसक्या बांधून यांना थेट तुरुंगांतच नेऊन गुदरतों. किशा, घरांतून एक चांगली दोरी घेऊन ये !

[ किशा जातो.

**नेत्रा :** बाबा, मी तुमच्या पायां पडतें.

**नीरा :** आई, तुला माझी शपथ आहे.

**चित्रा :** डॉक्टर, इश्श ! ! तुम्हीं माझी जीभ केव्हां तपासणार ?

**कचेश्वर :** चला, होतां का नाहीं घरांत चालत्या ! खबरदार आतां कोणी इथं उभ्या रहाल तर ! ( विद्यागौरीस ) चल, तूं हो पुढं ! पंडितजी, तुम्हीं तें नीरेचं सोंग कसं केलंत तें मला उद्यां दाखविलं पाहिजे बरं का—लाजूं नका—लाजूं नका ! नागनाथ, पळून जातील ते ! सोडूं नकोस त्यांना !

[ कचेश्वर, विद्यागौरी, नेत्रा, नीरा व चित्रा जातात.

**भुलेश्वर :** अहो—निरंजन का अवधूत कोण आहांत ते ! हें पहा, आतांपर्यंत मी माझा राग मोठ्या कष्टानं आवरून गप्प बसलों होतों—तुम्हीं मला मघाशीं वाटेल तशा शिव्या दिल्यात—पुस्तकाच्या गोण्या पाठीवर घेऊन फिरणारा निर्बुद्ध नंदीबैल म्हटलंत आणि हृदयेश्वरी देखील म्हणालांत !

**निरंजन :** हो, त्याबद्दल मी माझ्या थोबाडींत मारून घेतों—चूक झाली !

**भुलेश्वर :** आणि आज सकाळीं तुम्हीं माझ्यावर कारण नसतांना हल्ला केलांत आणि जवळ जवळ माझं डोकंही फोडलं होतंत !

**निरंजन :** अहो, मी भय्याचं सोंग घेतलं होतं ना !

**अरविंद :** तुम्हीं आतां जसं नीरेचं सोंग घेतलं होतं तसं यानं भय्याचं सोंग घेतलं होतं !

**भुलेश्वर :** माझं राहूं द्या हो ! पण इतकं असूनही आतांपर्यंत मी गप्प बसलों होतों—पण तुम्हीं माझ्या शीलासंबंधीं मघांशीं भलतंसलतं बोललांत—तें मात्र मी कधींही सहन करणार नाहीं ! एक वेळ मला तुम्हीं मूर्ख म्हटलंत तरी चालेल—

**निरंजन :** एक वेळ काय, अनेक वेळ म्हणतों कीं मी ! आणि जें खरं आहे तें चालायलाच पाहिजे !

**भुलेश्वर** : पण माझ्या शीलासंबंधीं संशय ! शील हें मनुष्याचं भूषण आहे.

**निरंजन** : मनुष्याचं आहे ! तुमचं नाहीं !

**भुलेश्वर** : जा, एक वेळ मीं तुम्हांला क्षमा केली आहे. फिरून असं बोलाल तर–

**निरंजन** : तर काय कराल ?

**भुलेश्वर** : तर काय करीन ? सांगू ? तर–आणखी एक वेळ फार झालं तुला तर क्षमा करीन !

**अरविंद** : ( हंसत ) बाकी निरंजन, तूं कांहींही म्हण, पंडितजीनं पोरीचं ॲक्टिंग मात्र फर्मास केलं ! ( बायकांच्या आवाजांत ) भय्या, तूं माझ्यावर इतकं प्रेम करतोस ? आणि माझं पण तुझ्यावर किती किती प्रेम आहे !

[ दोघं हंसतात.

**भुलेश्वर** : आतां का उगीच दुसऱ्याची थट्टा करतां आहांत ? स्वतःची फजिती झाली ती पुरे नाहीं का झाली ?

[ किशा हातांत दोऱ्याचें रीळ घेऊन येतो.

**किशा** : ह्यो घ्या दोरा !

**नागनाथ** : गाढवा, तुला दोरी आणायला सांगितली होती का दोरा ! वाण्याच्या दुकानांतला पुडा बांधायचा नाहीं मला. माणसं बांधायचीं आहेत ! जा. ( किशा डोकें खाजवीत जाऊं लागतो; ) अन् हें बघ, या पंडितांना घरांत घेऊन जा ! त्यांचा राग अनावर झाला आहे. यांच्या टाळक्यावर गार पाण्याच्या चारदोन बादल्या तिकडे नेऊन ओत ! म्हणजे हे थंडगार होतील ! जा—

**भुलेश्वर** : शील म्हणजे अशी गोष्ट आहे—

**किशा** : अहो शील, चला मुकाट्यानं, नाहीं तर फुटेल कानशील !

[ किशा व भुलेश्वर जातात.

**नागनाथ** : ( अरविंदास ) बेरड ! ( निरंजनास ) बदमाष !

**अरविंद** : वाटेल तें बोल ! आमचं चुकलं खरं !

**निरंजन** : अगदीं शरण आहोंत तुला !

**नागनाथ** : असलीं सोंगं घेऊन थोरामोठ्यांच्या घरांत शिरतां आणि त्यांच्या पोरी पळवून नेण्याचे कट करतां !

**अरविंद** : कबूल, आमच्या गाढवपणाचा अगदीं कळस झाला !

**निरंजन** : मूर्खपणाची कमाल झाली आमच्या ! सपशेल कबूल !

**नागनाथ :** चला, तुम्हांला पोलिसांच्या ताब्यांत देतों! पांच पांच वर्षें खडी फोडायला लावली पाहिजे तुम्हांला!

**अरविंद :** अरे बाबा, आतां कां लचके तोडतो आहेस आमचे! झालं! चुकलं!

**निरंजन :** मेलेल्याला आणखी कां मारतो आहेस? आतां पुढं काय करायचं तें सांग!

[ नागनाथ दोघांच्या चेहेऱ्याकडे आळीपाळीनें बघतो.

**अरविंद :** आतां बघतोस काय आमच्या तोंडाकडे! चुकलं म्हणतों ना!

**नागनाथ :** तुमच्या दोघांपैकीं जास्त गाढव कोण आहे तें पाहतों. मेहेरबान, नमस्कार आहे तुम्हांला! यापुढं प्राण गेला तरी आपण तुमच्या भानगडींत पडणार नाहीं!

**अरविंद :** क्षमा कर म्हणतों ना!

**नागनाथ :** मूर्ख माणसांना मदत करण्यांत कांहीं अर्थ नाहीं! एवढा बरा शहाणपणा केलांत कीं माझं नांव गुंतवलं नाहींत मधें! नाहीं तर स्वतःची हजामत करून घेतांना माझाही गळा कापला असतात चांगला!

**अरविंद :** पण मला काय ठाऊक कीं हा भय्या म्हणजे निरंजन! तूं मला सांगून कां ठेवलं नाहींस आधीं?

**नागनाथ :** तुला सांगायचा संबंध काय? आतां सगळ्या भानगडी मी काय तुला सांगत बसूं! मला वाटलं तुला वडिलार्जित कांहीं अक्कल असेल म्हणून! स्वतःचं काम सोडून तुला हा नसता फाजीलपणाचा उत्साह दाखवायला सांगितलं कोणी?

**निरंजन :** म्हणजे पहा तर खरं!

**नागनाथ :** तूं नको बोलूं! तूंही तितकाच गाढव आहेस! तुला कोणी सांगितलं होतं त्या नीरेला पत्र लिहायला! भेटण्यासाठीं अगदीं जीव चालला होता तुझा जसा कांहीं! तुम्ही तरुण मंडळी म्हणजे भारी उल्लू! अक्षता डोक्यावर पडायच्या आंतच अंतरपाट फाडून मोकळी व्हायची!

**अरविंद :** आणि हा बोलत होता तरी किती हळू! मोठ्यानं बोलला असता तर मीं याचा आवाज नसता का ओळखला!

**निरंजन :** तर, तर—प्रेमाच्या कानगोष्टी करतांना कोणी ओरडत नसतं मोठ्यानं! प्रेमाच्या कानगोष्टी म्हणजे कांहीं लग्नांतलीं मंगलाष्टकं नव्हत!

**नागनाथ :** पंडित भुलेश्वराशीं प्रेमाच्या कानगोष्टी ! ( हंसतो ) पुरुषाच्या आणि स्त्रीच्या आवाजांतला फरक कळण्याइतकी देखील अक्कल नाहीं तुला ! प्रेम आंधळं आहे असं म्हणतात ! पण प्रेम बहिरं देखील असतं हें मला नव्हतं ठाऊक !

**अरविंद :** आणि बरं का नागनाथ, ( निरंजनाची नक्कल करीत ) हृदयेश्वरी, तुला घट्ट मिठी मारून हृदयाशीं कवटाळून धरावं असं मला वाटतं !

**निरंजन :** अरे बाबा, आतां झाली एवढी आमची शोभा पुरे नाहीं का झाली ? आतां कां उगीच थट्टा करून जीव घेतोस !

**नागनाथ :** आतांपर्यंत जमवून आणलेल्या सगळ्या गोष्टींवर तुम्हीं पाणी सोडलंत ! आतां तुम्हीं जाणे आणि तुमच्या त्या भानगडी जाणे !

**अरविंद :** हें पहा दोस्त ! असा अवसानघात करणं बरोबर नाहीं ! प्रेमाच्या भानगडींत आपल्या मित्रांना मदत करण्यासारखं पुण्य नाहीं जगांत !

**निरंजन :** एवढीं दोन कार्यं जुळवून दिलीस तर स्वर्गांत जाशील, मित्रा ! आहेस कुठं !

**नागनाथ :** आतांच मला स्वर्गाच्या अंगणांत आल्यासारखं वाटतं आहे ! ( अरविंदास ) ए पागल, तूं जरा उभा राहा इथं ! तुला सांगण्यांत कांहींच अर्थ नाहीं ! निरंजन, पुढं काय करायचं तें मी तुला आधीं सांगतों ! मात्र आतां मी एकदांच या भानगडींत पडणार !

[ नागनाथ व निरंजन जातात.

**अरविंद :** सिनेमांतल्या नायकासारखी माझी स्थिति झाली आहे ! सारीं सोंगं घेऊन, कारस्थानं रचून, मारामाऱ्या करून पुन्हां मी आपला आहे तिथंच आहें !

बिकट प्रणयपथ हा ! वाटे.
चढण कठिण अति ! मार्ग सरळ नच,
दिसत मोहमय, दुरुनि भारी !
मृगजळ मोहक हरिणा जैसें,
प्रेमपंकिं जन तेंवि फसति या !

[ जातो.

## [ २ ]

चंडिराम अत्यंत हवालदील मुद्रेनें प्रवेश करतो.

**चंडिराम** : ( स्वतःशींच ) एक—दोन—तीन—चार—पांच—सहा—सात—सात! सात वर्षांचं काळं पाणी! आणि वर फांशीची शिक्षा! नाहीं—आधीं फांशीची शिक्षा आणि मग काळं पाणी—! 'उपास मज लागला, सखे बाई! दहिभात म्हणुनि चापला!'—नाटकांतलं गाणं लावूं का एखादं मी! इश्श! मला नाहीं गाणं म्हणतां येत—मला किनई राग फार येतो! हरामखोर—हात कलम करून टाकीन—कुमारिकेकडे वांकड्या नजरेनं पाहणारे तुझे डोळे फोडून रक्तबंबाळ करीन! हवालदार, ठोका याच्या हातांत बेड्या—एक—दोन—तीन—सात वर्षांचं काळं पाणी आणि फांशीची शिक्षा!

[ डोळे एकदम झांकून घेतो आणि किंचाळतो. नागनाथ प्रवेश करतो.

**नागनाथ** : कोण सरदारसाहेब—काय हो, असे भररस्त्यावर उभे राहून काय किंचाळताय?

[ त्याचे दंड धरून त्याला हलवितो.

**चंडिराम** : ( डोळे उघडून ) कोण तुम्ही? आतां माझ्या जिवांत जीव आला! कालपासून मला अगदीं वेड लागण्याची पाळी आली आहे. ( डोळे चोळून ) आतां जरासं शुद्धीवर आल्यासारखं वाटतं आहे मला! ( एकदम उसळून ) हरामखोर—बेशरम—डाकू—

**नागनाथ** : म्हणजे, तुम्हीं मला शिव्या देतां आहांत कीं काय—

**चंडिराम** : तुम्हांला नाहीं हो! तुमच्या या गांवांतल्या हलकट लोकांना! या गांवांतले सारे लोक दरवडेखोर आहेत! इथल्या एकूण एक माणसाला काळ्या पाण्यावर पाठविलं पाहिजे!

**नागनाथ** : म्हणजे मला देखील?

**चंडिराम** : तुम्हांला नाहीं हो! तुम्ही एकटेच काय ते सज्जन आहांत या गांवांत! पण बाकीच्यांना फांसांवर टांगलं पाहिजे—नाहीं—आधीं फांशीं दिलं पाहिजे आणि मग काळ्या पाण्यावर पाठविलं पाहिजे! डांबीस लेकाचे! कुठून या गांवांत पाऊल टाकण्याचा गाढवपणा केला असं मला झालं आहे!—

**नागनाथ** : म्हणजे—काय झालं काय! आणखी कुणीं त्रास दिला कीं काय तुम्हांला?

**चंडिराम :** त्रास ! अहो, नशीब म्हणून वांचलों—नाहीं तर आज कांहीं जिवंत दिसलों नसतों तुम्हांला ! एका बिलंदर सोनेरी टोळीच्या हातांत सांपडलों होतों चांगला—

**नागनाथ :** पण तुम्हीं काल त्या तुमच्या मित्राच्या घरीं गेलां होतां ना !

**चंडिराम :** तो हरामखोर तर त्या डाकूंच्या टोळीचा म्होरक्या होता—

**नागनाथ :** काय म्हणतां काय ? तो तुमचा लहानपणाचा मित्र नव्हता ?

**चंडिराम :** अहो, कसचा मित्र न् कसचं काय ! बदमाष लेकाचा !

**नागनाथ :** काय म्हणतां ! मला तर तो तुमचा जीवश्च कंठश्च मित्र वाटला ? तुमच्या घरच्या एकूण एक मंडळींची त्याला माहिती होती—तुमचे मामा—तुमची मावशी—

**चंडिराम :** अगदीं नांव काढूं नका त्याचं ! चांगलंच बनवलं त्यानं ? आणि मला घरीं नेऊन—छे, त्या गोष्टीची आठवण झाली कीं अंगावर शहारा येतो !—भयंकर उलट्या काळजाचा माणूस असला पाहिजे तो !

**नागनाथ :** नाहीं पण, मला सांगायला काय हरकत आहे !

**चंडिराम :** अहो, त्यानं मला एका घरांत नेलं—तिथं त्याचा एक थेरडा बाप होता—तो तर त्याच्याहीपेक्षां इरसाल होता—त्यानं तर मला बोलून अगदीं गारच केलं—आणि अखेर शेवटीं कडी केली त्याच्या त्या कारटीनं—इतकी बेशरम आणि बेफाट पोरगी मीं कधीं जन्मांत पाहिली नसेल. आतां तुम्हीच सांगा—तुम्ही मला इतके ओळखतां—एखाद्या अनोळखी मुलीचा हात मी एकदम धरणं—म्हणजे वाईट हेतूनं—शक्य आहे का ? नाहीं, तुम्हीच सांगा, शक्य आहे का ?

**नागनाथ :** छे छे, नांव कशाला ? स्त्रियांच्या बाबतींत असलं भलतं सलतं तुमच्या हातून होणंच शक्य नाहीं !

**चंडिराम :** अहो, परस्त्रीलाच काय पण स्वस्त्रीला देखील मातेसमान मानणाऱ्या वृत्तीचा मी माणूस आहें. लग्न झाल्यानंतर बायकोच्या अंगाला हात लावण्यापूर्वी मला हजार वेळां विचार करावा लागेल ! आणि ती निर्लज्ज पोरटी ' मीं तिचा हात धरला ' म्हणून खुशाल ओरडूं लागली !

**नागनाथ :** आतां तुम्ही सांगूंच नका—आतां माझ्या सगळं ध्यानांत आलं तें. तो थेरडा असा माझ्याच अंगाचा आणि रंगाचा होता ना—

**चंडिराम :** बरोबर, तुमच्या इतकाच उंच होता तो आणि डोळेहि, मला वाटतं, तुमच्यासारखे होते.

**नागनाथ :** आणि ती पोरटी अशी नाकेलीशी–डोळे चांगले पाणीदार आणि डाव्या गालावर एक बारकासा तिळ!

**चंडिराम :** तिच्या गालाजवळ इतका मी गेलों आहे कशाला! पण तुमचं बाकीचं वर्णन अगदीं तंतोतंत जुळतं!

**नागनाथ :** आणि त्यांनीं तुमच्याकडून एक कबुलीजबाब देखील बळजबरीनं लिहून घेतला असेल—

**चंडिराम :** अगदीं बरोबर! तुम्हांला काय माहिती?

**नागनाथ :** ऐका तर खरं! मी तुम्हांला त्या जबाबाचा मजकूर देखील सांगतों. " बोका—इ—बंगाल या नांवाचा दरवडेखोर तो मीच आहें."—थांबा— " आतांपर्यंत मी एकंदर सात लग्नं केलीं आहेत; तीन बायका गळा दाबून ठार मारल्या आहेत........"

**चंडिराम :** अगदीं अक्षर न् अक्षर बरोबर! म्हणजे, तुम्हीं तो कागद पाहिला आहे कीं काय!

**नागनाथ :** कागद न बघतां मी सांगतों! बोला आहे की नाहीं बरोबर?

**चंडिराम:** पण तुम्हांला काय ठाऊक?

**नागनाथ :** मला काय ठाऊक? अहो, दोन महिन्यांपूर्वी मी देखील त्या बदमाषांच्या तावडींत सांपडलों होतों ना!

**चंडिराम :** काय म्हणतां!

**नागनाथ :** तुम्हांला जसं त्यांनीं फसवलं, अगदीं तसं त्यांनीं मला फसवलं! आणि तुमच्यासारखाच एक भयंकर कबुलीजबाब त्यांनीं माझ्याकडून लिहून घेतला! एवढंच नव्हे तर त्या भामट्यांनीं आतांपर्यंत चारदोन लोकांना अशा रीतीनं फसविलं आहे.

**चंडिराम :** आतां थोडा जिवांत जीव आला! मला वाटलं मी एकटाच गाढव ठरलों कीं काय! पण त्या कागदाचा ते लोक भलतासलता उपयोग तर करणार नाहींत ना!

**नागनाथ :** छे, तुम्हीं काय घाबरतां! असल्या कागदी चिठोऱ्यावर विश्वास ठेवायला लोक कांहीं गाढव नाहींत! मग काल मीं तुम्हांला सामान स्टेशनावरच

ठेवायला सांगितलं तें बरं झालं, नाहीं का ? नाहीं तर तुम्हांला त्या बदमाषांनीं पुरतं लुबाडलं असतं !

**चंडिराम :** त्या घरांतून मी कसाबसा जीव घेऊन बाहेर पडलों आणि तेव्हांपासून हा असा भ्रमिष्टासारखा भटकतों आहें रस्त्यांतून ! झोंप नाहीं कीं जेवण नाहीं—!

**नागनाथ :** काय म्हणतां ? अरेरे, फारच तुमचे हाल झाले सरदारसाहेब !

**चंडिराम :** या गांवांतल्या लोकांना कांहीं विचारायची देखील सोय नाही ! एकाला मीं धर्मशाळेचा रस्ता विचारला, त्यानं सरळ मला एका नाटकशाळेचा पत्ता दिला !

**नागनाथ :** म्हणजे रात्रभर तिथं होतां कीं काय ?

**चंडिराम :** छेः छेः, भलतंच ! आतां आधीं आम्हांला त्या कचेश्वरपंत देशमुखांच्या वाड्याचा पत्ता सांगा पाहूं ! ते लोक माझी कालपासून वाट एकसारखी पहात बसले असतील !

**नागनाथ :** म्हणजे काकासाहेब देशमुख म्हणतां कीं काय ! त्यांचा तुमचा काय संबंध ?

**चंडिराम :** त्यांचा आमचा हल्लीं संबंध नसला तरी लवकरच जुळून येणार आहे ! त्याच संबंधांत तर मी इथं आलों आहें ! त्यांचा जांवई होणार आहें ना मी !

**नागनाथ :** काय म्हणतां, अजब बातमी सांगितलींत तुम्हीं ही !

**चंडिराम :** म्हणजे यांत अजब कसं काय आहे बुवा ! तुम्ही तरी चमत्कारिकच दिसतां मला !

**नागनाथ :** म्हणजे काकासाहेबांच्या त्या थोरल्या मुलीशीं—नेत्राशीं— तुमचं लग्न ठरलं आहे कीं काय ?

**चंडिराम :** थोरली कीं धाकटी तें आपण कशाला विचारतों आहें ! थोरली काय आणि धाकटी काय ? आपलं लग्न झाल्याशीं कारण ! पण मला वाटतं ती नेत्राच असावी ! हो, नेत्राच—

**नागनाथ :** मग ती थोरलीच ! पण तुम्हीं स्वतः पाहिली आहे का तिला ! का पोस्टांतूनच लग्न ठरवलंत ?

**चंडिराम :** मुलीला काय पाह्यचंय ? मुलीसारखी मुलगी असणार ! फार सुंदर आहे म्हणतात ती ! माझ्याजवळ फोटो देखील आहे तिचा ! ( फोटो खिशांतून

काढतो.) पाहिलांत ह्या ! ह्या फोटो मजजवळ होता म्हणून कालची रात्र कशी तरी निभावली.

**नागनाथ :** फोटो राहूं द्या हो ! फोटोवरून काय समजतंय ? फोटोमध्यें माकड-देखील मदनासारखं दिसतं ! पण हें तुमचं लग्न नक्की ठरलं आहे का ?

**चंडिराम :** नक्की म्हणजे ! अहो, बोहोल्याच्या विटा आणि सुगडं देखील येऊन पडलीं असतील तिकडं ! मीं देखील आमच्या तिकडे लग्नाची जय्यत तयारी करून ठेवली आहे ! लग्नाचीच काय पण पुढच्या संसाराची देखील मी बेगमी केलेली आहे ! म्हणजे—पाळणा आणि दुधाची बाटली देखील खरेदी करून बसलों आहें मी ! आहांत कुठं ?

**नागनाथ :** मग काय आतां इलाज नाहीं ! बाकी एवढं खरं कीं त्या थेरड्यानं आपला डाव चांगलाच साधला. पोरगी एकदांची उजवून टाकली म्हणायची !

**चंडिराम :** म्हणतां काय तुम्हीं ? म्हणजे आमच्या या लग्नांत कांहीं आणखी भानगड आहे कीं काय ?

**नागनाथ :** भानगड आहे कीं काय तें परमेश्वराला ठाऊक ! आपल्याला सांगून काय करायचें आहे ! ज्याचं तो जाणो !

**चंडिराम :** अहो, असं तिऱ्हाइतासारखं काय बोलतां ? काय असेल तें स्पष्ट तरी सांगा !

**नागनाथ :** छे, दुसऱ्याच्या लग्नामध्यें मोडता घालण्यासारखं पाप नाहीं ! नकोच तें आपल्याला ! तुम्ही मला भलता आग्रह करूं नका !

**चंडिराम :** पण तुम्ही माझे इतके विश्वासू हितचिंतक, तुमच्यामुळंच ना मी या गांवांत आतांपर्यंत शाबूद राहिलों.

**नागनाथ :** अहो, जें घडायचं तें घडल्यावांचून थोडंच राहातं ! जाऊं द्या ! जो करील तो भरील ! आपण कशाला वाईटपणा घ्या ?

**चंडिराम :** तुम्हीं तर मला अगदीं घाबरवून सोडलं आहे. अहो, या वेळीं जर तुम्हीं मला योग्य सल्ला दिला नाहींत तर माझ्या साऱ्या आयुष्याचं खोबरं होऊन जाईल ना—

**नागनाथ :** पण मीं आतां त्यांत साखर घातल्यानं त्याची थोडीच खिरापत होणार आहे ? मला तुमचीहि भलाई नको आणि त्यांचेहि शिव्याशाप नकोत ! आपण आपली दुरून गंमत पहावी म्हणजे झालं !

**चंडिराम :** तुमचा आमचा पूर्वजन्मींचा ऋणानुबंध आहे तो तरी लक्षांत

घ्या ! आतां तुम्हीं मला सांगितलं नाहींत तर माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हांला !

**नागनाथ :** अरेरे, ही शपथ घालून मात्र तुम्ही माझ्या काळजाला विळखा घातलांत ! आतां माझा नाइलाज आहे. केवळ तुमच्या कल्याणाच्या कळकळीनं म्हणूनच आतां सांगतों ! यांतलं एक अवाक्षर देखील बाहेर फुटतां कामा नये. (हलकेंच) अहो, या कचेश्वरपंत देशमुखासारखा पाजी माणूस नाहीं या गांवांत !

**चांडिराम :** काय म्हणतां !

**नागनाथ :** पहिल्या दोन बायका त्यानं जीवें ठार मारल्या ! हल्लींची तिसरी बायको आहे !

**चांडिराम :** अरे बाप रे ! !

**नागनाथ :** आणि महारोग आहे त्याला !

**चांडिराम :** महारोग ?

**नागनाथ :** मग काय तर ! म्हणून तर सकाळसंध्याकाळ तो काढे पीत असतो आणि औषधं खात असतो. इतकी प्रकृतीची तो काळजी घेतो म्हणून आत्तांपर्यंत कसा तरी तग धरून राहिलाय !

**चांडिराम :** मग त्याच्या या पोरीला देखील ती बाधा असेलच ?

**नागनाथ :** अजून कांहीं तसा बभ्रा नाहीं ! पण आज नाहीं उद्यां तिच्यामध्यें तो रोग उतरल्याशिवाय राहील का ? नाहीं म्हणायला तिच्या दोन्ही ओठावर कोड आहे !

**चांडिराम :** काय—सांगतां काय तुम्ही !

**नागनाथ :** म्हणून तर ती पोरगी अष्टौप्रहर ओठ रंगवून बसते ! लग्न झाल्यानंतर पहिल्याच दिवशीं ही गोष्ट तुमच्या लक्षांत आली असती !

**चांडिराम :** मला म्हणजे यांतलं एक अक्षर देखील ठाऊक नव्हतं ! दैवानं खैर केली म्हणून तुमची गांठ पडली !

**नागनाथ :** आणि त्या पोरीचं वर्तन तर कांहीं विचारूंच नका ! अहो, तुमचं आमचं नांव ठाऊक नसेल कोणाला इथं; पण या पोरीचं नांव या पंचक्रोशींत प्रख्यात आहे. या गांवांतल्या प्रत्येक तरुणाच्या दप्तरांत तिच्या चरित्राचीं चार-दोन पान सांपडल्याखेरीज राहणार नाहींत ! तुम्हीं मला मघाशीं काकासाहेबांचं घर कुठं आहे म्हणून विचारलंत ! तुम्हांला जर गंमत पाहायची असेल तर तुम्ही गांवांतल्या कोणत्याहि माणसाला त्यांचा पत्ता विचारून पहा ! अगदीं खडा न्

खडा माहिती मिळेल तुम्हांला ! कोणत्या रस्त्यानं जायचं, घरांत कसं शिरायचं, मागच्या दारानं जायचं का शिडी लावून दुसऱ्या मजल्याच्या खिडकींतून आंत उडी टाकायची–या सगळ्या गोष्टींचा नकाशा देखील काढून मिळेल !

**चंडिराम :** असली पोरगी आहे म्हणतां ती ! तरी म्हटलं त्या थेरड्यानं मला इतकी घाई करून तातडीनं कां बोलावलं इकडे ! असली घोरपड माझ्या गळ्यांत पडली असती तर तिच्या शेपटीला धरून कोणताहि तगडा तानाजी भर दिवसा माझ्या घराची भिंत चढून खुशाल आंत आला असता !

**नागनाथ :** एवढ्याकरतांच तर तिच्या बापानं घरांतल्या खिडक्या न् जाळ्या अष्टौप्रहर बंद करून दरवाजाला कुलूप ठोकलं आहे आणि घरांतून बाहेर जाण्याची बंदी केली आहे ! इतका बंदोबस्त आहे तरी ती वस्ताद पोरगी हजार लटपटी करून आपले दोस्त घरांत आणतेच ! आतां कालच्या रात्रींचीच गोष्ट ! या पोरीचे दोन जवान, दोस्त वेषान्तर करून त्या घरांत एक आठवडाभर दबा धरून राहिले होते. त्यांतला एक झाला होता डॉक्टर आणि दुसरा झाला होता भय्या !

**चंडिराम :** म्हणजे मला तुम्ही खरं सांगतां का नाटक सांगतां आहांत एखादं !

**नागनाथ :** अहो, खरं म्हणून काय विचारतां ! शेवटीं तें बंड सारं काल रात्रीं बाहेर पडलं आणि त्या दोघां माणसांना पोलिसांनीं हातकड्या घालून पकडून नेलं ! अगदीं काल रात्रीचीच गोष्ट !

**चंडिराम :** मग काल आमचे पाय त्या घराला लागले नाहींत ही ईश्वराची कृपाच म्हटली पाहिजे ! नाहीं तर त्या भानगडींत आमचीहि उचलबांगडी झाली असती ! आतां कळलं ! या पोरीचं या गांवांत कां लग्न जमलं नाहीं तें ! मला आपलं वाटलं कीं उत्तम स्थळ आहे—

**नागनाथ :** उत्तम ! अहो, फार प्रेक्षणीय स्थळ आहे हें ! तुम्हीं देखील एकदां पाहिलेलं असावं ! हें सुप्रसिद्ध स्थळ पाहण्यासाठीं लांबलांबच्या प्रांतांतले तरुण लोक तंगड्या तोडीत या गांवापर्यंत येतात ! या स्थळामुळं तर या गांवच्या म्युनिसिपालिटीचं उत्पन्न दिढीनं वाढलं आहे ! भूगोलाच्या पुस्तकांत देखील हें गांव या स्थळासाठीं प्रसिद्ध आहे असं छापून येऊं लागलं अ हे असं म्हणतात !

**चंडिराम :** या भूगोलांत जमा झालेल्या स्थळाशीं लग्न करून, मी नामांकित इतिहासप्रसिद्ध पुरुषच झालों असतों असं म्हणायला हरकत नाहीं ! असल्या कारटीचा फोटो जवळ बाळगण्यांत काय अर्थ आहे ?

[ फोटोचे फाडून तुकडे करतो.

**नागनाथ :** आणि या मुलीची सावत्र आई तर विचारूंच नका ! भयंकर कजाग आणि जहांबाज ! चोवीस तासांत तिच्या तोंडांतून जितकी वाफ जाते तितकी जमा करून ठेवली तर तेवढ्या वाफेवर एका लग्नाच्या प्रयोजनाचा स्वयंपाक शिजून निघायला हरकत नाहीं ! महांकाळी तोफेला जर नाकडोळे आले आणि पाय उमटले तर ती हुबेहूब या बयासारखी दिसेल ! एवढं सांगितलं म्हणजे तुम्हांला तिची थोडीशी कल्पना येईल !

**चंडिराम :** आतां या थेरड्याचा कावा माझ्या चांगलाच लक्षांत आला ! म्हणजे या पोरीचं आमीष दाखवून मला या तोफेच्या तोंडीं देण्याचा त्याचा विचार असला पाहिजे ! काय हो, हा म्हातारा खूप श्रीमंत आहे असं म्हणतात हें तरी खरं आहे का ?

**नागनाथ :** (हंसून) श्रीमंत ? त्याचा वाडा मोतमिल मारवाड्याकडे चाळीस हजाराला गहाण आहे !

**चंडिराम :** चाळीस हजाराला गहाण ? आतां अगदीं शर्थ झाली ! म्हणजे माझ्याशीं नातं जोडून मला लुटायचा याचा बेत होता कीं काय ! आज तुम्हीं मला अगदीं मोठ्या संकटांतून वांचवलंत ! तें कांहीं नाहीं ! आतां असाच्या असा जातों आणि त्या थेरड्याचा निकालच लावतों ! बदमाष, पाजी लेकाचा ! आतां तर माझी अशी अगदीं खात्री आहे कीं, काल इथं आल्यापासून ज्या सोनेरी टोळीनं माझा पिच्छा पुरवला आहे, त्याच्या मुळाशीं हाच म्हातारडा असला पाहिजे !

**नागनाथ :** मला देखील असाच संशय येतो ! चला, मी देखील तुमच्याबरोबर येतों पाहिजे तर !

**चंडिराम :** नको, तुम्हीं लांबूनच नुसतं घर दाखवा ! मी एकटाच त्याच्या घरांत जाऊन त्याची चांगलीच पाद्यपूजा करतों ! मला फसवूं पाहतो काय ?

**नागनाथ :** (स्वगत) कोण कुणाची पाद्यपूजा करतो तें बघूंच आतां ! (उघड) चला !

[ जातात.

[ ३ ]

कचेश्वराचें घर. कचेश्वर प्रवेश करतो.

**कचेश्वर :** तब्बल चोवीस तास होऊन गेले, तरी आमच्या जहागिरदार-साहेबांचे अद्यापि बारा वाजताहेत ? झालं तरी काय त्यांना ! का वाटेंतच त्यांचे बारा वाजले ! म्हणजे झालं ! सगळाच बोजवारा वाजला ! आधींच काल रात्रींच्या त्या भानगडीपासून हिनं माझ्यावर एकसारखा भडिमार चालवला आहे ! त्यांत आणखी असलं कांहीं झालं म्हणजे मला ह्या घरांतून पोबाराच करायची पाळी यायची ! सकाळपासून आणखी पोटांत काय बिघडलं आहे कोणास ठाऊक ! घड्याळ नादुरुस्त झालं म्हणजे तें जसं उलगडून बघतां येतं, तसं स्वतःचं बिघडलेलं पोट स्वतःला उलगडून बघतां आलं असतं तर केवढी सोय झाली असती ! अंगहि कालपासून खाजायला लागलं आहे. त्या अरविंद्यानं औषधाच्या नांवाखालीं मला काय काय पाजलंय कोणास ठाऊक ! किशा—ए किशा, ( किशा येतो. ) अरे, ती सार्सापरील्याची बाटली घेऊन ये—आणि हें बघ—तें च्यवन-प्राश, आणखी भल्लांतककल्प, आणि ती खदिरारिष्टाची बाटली—

**किशा :** डोक्सं अक्शी खलास झालं !

**कचेश्वर :** आणि तो योगिराजगुग्गुळ—

**किशा :** बस्—बस्—बस् !

**कचेश्वर :** बस् बस् म्हणजे ! तूं कोण सांगणार मला ? मला लागतील तितकीं औषधं मी घेणार ! तुझ्या पोटांत कां दुखतं !

**किशा :** न्हाई–दुकतं तुमच्याच पोटांत ! पन इकर्ती संमदी औषधं तुमच्या घशामंदी जात्यात तरी कशीं ! माझ्या डोक्शांत तर एका औषधाचं बी नांव शिरत न्हाई—

**कचेश्वर :** थांब, उद्यांपासून तुला तो बेचाळीस वनस्पतींचा काढाच पाजला पाहिजे, म्हणजे सगळीं औषधांचीं नांवं लक्षांत राहतील तुझ्या ! चल निघ ! आणि त्या नागनाथाला पाठवून दे. ( किशा जातो ) ‘ जहागिरदार बेपत्ता झाले ’ म्हणून एक जाहिरात द्यायला पाहिजे कोठल्या तरी वर्तमानपत्रांत ! आणि चार-दोन पोलिसस्टेशनांवर वर्दीहि देऊन ठेवलेली बरी.

[ पोलीस जमादाराच्या पोषाखांत निरंजन येतो.

**निरंजन :** कचेश्वरपंत आपणच ना ?

**कचेश्वर** : हो, मीच तो ! बरं झालं तुम्ही आलांत—आतां तुमच्याच चौकीवर वर्दी देण्यासाठीं माणूस पाठवणार होतों.

**निरंजन** : माणूस पाठविण्याची कांहींच जरूरी नव्हती.—आमच्याकडे आधींच ही वर्दी आलेली आहे; आणि मी वारंटहि बरोबर घेऊन आलों आहें.

**कचेश्वर** : वारंट !—कसलं वारंट !

**निरंजन** : पकडवारंट ! साध्या वारंटानं कसं भागणार ?

**कचेश्वर** : पण वारंटाची काय जरूर ?

**निरंजन** : वा, वारंट असल्याशिवाय आम्हांला अटक करतां यायची नाहीं !

**कचेश्वर** : म्हणजे, कोणासंबंधीं बोलतां आहांत तुम्ही हें ?

**निरंजन** : तुम्ही कोणासंबंधीं वर्दी देणार होतां ?

**कचेश्वर** : कोणासंबंधीं म्हणजे—आमच्या पाहुण्यासंबंधीं !

**निरंजन** : म्हणजे काल बाराच्या गाडीनं तुमच्या इथं जे येणार होते, तुम्ही ज्यांना आणण्यासाठीं स्टेशनावर तुमचा माणूस पाठविला होता, तेच ना ?

**कचेश्वर** : होय, तेच ते—जाफराबादचे जहागिरदार !

**निरंजन** : ( हंसून ) जहागिरदार ! म्हणजे तुम्ही देखील त्या डाकूला अजून जहागिरदार समजतां आहांत कीं काय ?

**कचेश्वर** : काय म्हणतां तुम्ही ? कोण डाकू !

**निरंजन** : अहो, तोच तो ! तुमचा जाफराबादचा जाहागिरदार ! त्याच्यावरच वारंट बजावण्यासाठीं मी इथं आलों आहें ! फार बिलंदर दरवडेखोर आहे तो !

**कचेश्वर** : काय–सांगतां काय तुम्ही ? म्हणजे, तो जहागिरदार नाहीं ?

**निरंजन** : तें त्याचं सोंग आहे ! उत्तर हिंदुस्थानांत बोका—ई—बंगाल नांवाचा एक प्रसिद्ध दरवडेखोर आहे—

**कचेश्वर** : हो, ऐकलं आहे खरं त्याचं नांव !

**निरंजन** : जो नानातऱ्हेचीं सोंगं घेतो आणि चांगल्या चांगल्या लोकांच्या घरांत शिरून त्यांच्या बायका नि मुली पळवतो—

**कचेश्वर** : अरेच्या !

**निरंजन** : आणि ज्याला पकडून देण्यासाठीं सरकारनं एक लाख रुपयांचं बक्षीस लावलं आहे—

**कचेश्वर** : काय म्हणतां !

**निरंजन** : तोच हा !

**कचेश्वर :** काय, तोच हा ! अरे बापरे, जबरदस्त धक्का बसला तुमच्या या बातमीनं माझ्या काळजांत !

**निरंजन :** म्हणजे, तुम्हीं याला पाहिला देखील नाहीं काय ?

**कचेश्वर :** छे हो ! वर्तमानपत्रांतील जाहिरात बघून मीं हें लग्न ठरवलं ! विवाहाच्या बाबतींत वर्तमानपत्रावर विश्वास ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं !

**निरंजन :** अहो, नुसत्या जाहिरातीनं जर लग्नं जुळायला लागलीं तर कोणताहि नवरामुलगा रजिस्टर्ड पार्सलनें घरबसल्या मागवतां यायचा नाहीं का ?

**कचेश्वर :** अगदीं खरं आहे तें ! कालपासून आमच्या बायकोनं माझं कपाळ उगीच नाहीं उठवलं ! बाकी, या लग्नाच्या बाबतींत पुरुषांच्यापेक्षां बायकांना अधिक कळतं असं म्हणतात, तें अशा वेळीं तरी खरं वाटूं लागतं !

**निरंजन :** आतां परवांचीच गोष्ट घ्या ! चांगल्या एका सभ्य गृहस्थाची मुलगी यानं दिवसाढवळ्या पळवून नेली आणि ती भानगड वीस हजारांची लांच देऊन कशी तरी मिटविली ! आणि आपण फरारी झाला !

**कचेश्वर :** तो थेट इकडे आला कीं काय ? असल्या घरफोड्या माणसाला वीस हजार रुपये हुंडा देणार होतों मी ! म्हणजे हे वीस हजार रुपये त्यानं आणखी एखाद्या पोरीला पळविण्याच्या कामीं खर्च केले असते ! छान !

**निरंजन :** अहो, आतांपर्यंत यानं सात लग्नं केलीं आहेत !

**कचेश्वर :** काय, सात ! म्हणजे त्याचीं लग्नं देखील आधीं झालेलीं आहेत कीं काय ! चांगला संसारी दरवडेखोर दिसतो आहे हा ! म्हणजे प्रपंच करून फावल्या वेळांत हा दरवडे घालतो, का दरवडे घालून उरलेल्या वेळांत प्रपंच चालवतो !

**निरंजन :** आणि त्यांपैकीं सहा बायकांचा खून करून आधींच निकाल लावून टाकलेला आहे !

**कचेश्वर :** म्हणजे एका वेळीं हा एकच बायको शिल्लक ठेवतो असं दिसतं !

**निरंजन :** या बाबतींत त्याचा लेखी कबुलीजबाब आमच्या हातीं आलेला आहे ! किंवा महाप्रयासानं आम्हीं तो मिळविला आहे असं म्हणा ना ! हा पाहिलांत ! ( खिशांतून कागद काढतो. ) अगदीं खुद्द त्याच्या अक्षरांत लिहिलेला हा कबुली-जबाब आहे ! खालीं त्याची सही देखील आहे !

**कचेश्वर :** बरोबर ! हें त्याचंच अक्षर आणि त्याचीच ही सही ! मजजवळ त्याचीं चारपांच पत्रं आहेत ना ! ( पत्र मनांत वाचतो. ) अरे बापरे ! काय भयंकर माणूस आहे हा ! ' तीन बायका गळा दाबून ठार मारल्या ! दोघींचा कडेलोट

केला ! आणि एकीला विषप्रयोग केला ! आणि पोरीबाळी किती पळविल्या याची खानेसुमारी करतां येत नाही ! '

**निरंजन** : दोन वर्षं त्याच्यावर वारंट सुटलेलं आहे, पण अजून तो सरकारच्या हातीं लागत नाहीं ! आतां कालच तो इथं आला—

**कचेश्वर** : म्हणजे, तो इथं आला आहे कीं काय ! काय हरामखोर आहे ! आणि आम्ही त्याची इकडे वाट पाहात बसलों आहोंत !

**निरंजन** : काल बाराच्या गाडीनं तो इथं आला असं आम्हांला कळलं ! गाडींतून पाय खालीं टाकला नाहीं तोंच बेधडक एका सभ्य माणसाच्या घरांत शिरला आणि त्याच्या तरुण अविवाहित मुलीचा सरळ जाऊन त्यानं हात धरला ! आरडाओरड झाली तसा तो मागच्या दारानं पसार झाला !

**कचेश्वर** : म्हणजे, सव्वा लक्ष पोरी पळविण्याचा त्यानं संकल्प केला आहे कीं काय ? कमाल आहे ! लग्नाच्या निमित्तानं हा डाकू आमच्या घरांत शिरला असता म्हणजे त्यानं आमचं अंतःपुर अर्ध्या घटकेंत ओस पाडलं असतं.

**निरंजन** : बरं आहे देशमुखसाहेब, जातों तर मी ! एखादे वेळीं हा इसम इथं येण्याचा संभव आहे. तरी तुम्ही आपले सावध असा ! अर्थात् आम्ही त्याच्या मागावर आहोंतच !

**कचेश्वर** : तें तुम्ही आतां सांगूंच नका ! तो इथं आला कीं त्याचा फडशाच पाडतों !

**निरंजन** : मात्र, त्याच्याशीं फारसा अतिप्रसंग करूं नका ! बेतानंच असा !

**कचेश्वर** : त्याची तुम्ही काळजीच करूं नका ! तो काय मला करणार आहे ! मला तर तो कांहीं पळवून नेत नाहीं ना !

**निरंजन** : नाहीं—तसं नाहीं मी म्हणत ! पण त्याच्या खिशांत पिस्तूल म्हणा—बॉंब म्हणा—कांहीं तरी भानगड असायची ! म्हणून म्हणतों सावध असलेलं बरं ! येतों तर.

[ जातो.

**कचेश्वर** : मोठ्या प्राणसंकटांतूनच वांचलों म्हणायचा आज ! बरं, वेळेवर सगळं कळलं ! नाहीं तर माझ्या पोरीच्या सर्वस्वाचा सत्यानाशच होणार होता ! मात्र या सर्व गोष्टींचा माझ्या काळजाला एवढा धक्का बसला आहे कीं, माझी प्रकृति पूर्वपदावर यायला सहा महिने तरी मला काढ्याचं प्रमाण दुपटीतिपटीनं वाढवावं लागणार !

[ एक मारवाडी येतो.

**मारवाडी :** जय गोपाळ–जय गोपाळ !

**कचेश्वर :** जय गोपाळ ! कोण हो तुम्ही ? ए किशा, ( स्वगत ) वाटेल ती मंडळी आंत घुसायला लागली आहेत हा भय्या निघाल्यापासून–पण नकोच ती आठवण !

**मारवाडी :** हः हः ! ए घेरचे मालकसाहेब आपणच ? आनंद ज्याला ! लई आनंद ज्याला ! आमी तो मोतीमल मारवाडी !

**कचेश्वर :** मोतीमल असा कीं मातीमोल असा ! काय काम आहे तुमचं ?

**मारवाडी :** ते वार्ता सुनली तवापासून आमचा दिल तद्दन खूश ज्याला ! तुमच्या घर तो लई च्यांगला हाय ! ओच्छामा ओच्छा तो पच्यास हजार तो कोनीबी आपेल ! आतां हमच्या पैशाची तो कई फिकीरच नाय ! तुमच्या छोकरीचा लगीन ठरला—लई आनंद ज्याला हामाला !

**कचेश्वर :** कुणीं सांगितलं आमच्या मुलीचं लग्न ठरलं आहे म्हणून ?

**मारवाडी :** अरे, कुनी शांगितला काय ! अख्खी दुनिया बोलते ! जाफराबादचा जहागिरदार तुमच्या जमाई होएल म्हणून !

**कचेश्वर :** तो दरवडेखोर माझा जांवई ! लोकांना बोलायला काय होतंय ! मूर्ख लेकाचे !

**मारवाडी :** काय मष्करी करते काय हिनामदारसाहेब ! लोक जवा दो; पण पोते जहागिरदारसाहेबाने हमाला सांगितला ते बी काय झूटच ?

**कचेश्वर :** कुणीं ! खुद्द जहागिरदारसाहेबांनीं सांगितलं ! डांबीस लेकाचा ! धडधडीत बदनामी करतो माझी !

**मारवाडी :** हिनामदारसाहेब, तुम्ही शोंग तर लई छान करते ! तुम्ही नाटकामंदी जाएल तो मजा करेल ! जमाईला बी गाली देते ! ( मोठमोठ्यानें हंसतो. ) अरे, हमी त्याचे मोठे दोस्त हाय ! उगाच नाय चाळीस हज्यार रुपया त्येला हमी दिला !

**कचेश्वर :** चाळीस हजार रुपये ! कोणाला चाळीस हजार रुपये दिले ?

**मारवाडी :** अरे, तुमच्या जमाईला ! ते मागे एका पोरीच्या घोटाळा केला होता ते वखत हमी त्याला वीस हज्यार रुपया दिला अने—

**कचेश्वर :** आणि दुसरे वीस हजार रुपये दुसरी एखादी भानगड निस्तरण्यासाठीं दिले कीं काय ?

**मारवाडी :** नाय नाय, हिनामदारसाहेब ! तुमच्या जमाई तो लई सारा माणस हाय ! तुमच्या पोरीचं लई च्यांगलं झालं बगा—अने आमच्या चाळीस हज्यार रुपिया तर हमाला अगदीं मिळाला !

**कचेश्वर :** हो, मिळाले ! वाट बघत बसा जा ! त्या डाकूला दिलेले चाळीस हजार रुपये परत येण्याची आशा करतां ? जा, घरीं जाऊन दिवाळं काढा, नाही तर बालाजीच्या देवळाशेजारी एखादं काबलीचं दुकान उघडा !

**मारवाडी :** अरे, काय बात करते तुमी ! हमची एक दोडिया बी गुमायची नाय ! पण तुमच्या ए घर तो लई मोठा हाय ! पच्यास हज्यार रुपिया तो कई खोटा नथि !

**कचेश्वर :** म्हणजे ! आमच्या घराचा काय संबंध !

**मारवाडी :** अरे, ए तुमच्या घर तो तुमच्या जमाईनी चाळीस हज्याराला आमचेपाशीं गहाण टाकला हाय ! कागळ बी ज्याला हाय !

**कचेश्वर :** चोर, दरवडेखोर ! माझं घर तुमच्याकडे चाळीस हजार रुपयाला गहाण टाकतो काय तो !

**मारवाडी :** नई तो काय मोफत रुपिया दिला काय त्येला ?

**कचेश्वर :** काय बेशरम भामटा आहे हा ! उद्यां हा गंगानदीचं गहाणपत्र देखील लिहून द्यायचा कोणाला ! डोक्यावर अक्षता पडायच्या आधींच सासऱ्याच्या घरावर तुळशीपत्र टाकून मोकळा ! नशीब आमचं, यानं घरच गहाण टाकलं, नाहीं तर लग्नाच्या आधीं हा बायको देखील गहाण टाकायचा ! आणि तुम्ही पण—खूप धंदे करतां मारवाडी शेट !

**मारवाडी :** नाय, पण तुम्ही तो लई मजा करते ! तुमी नाटकामंदी जाएल तो गजब करेल ! अरे, ते तर तुमच्या घेरजमाई हाय !

**कचेश्वर :** कोण—तो आमचा घरजांवई ! आतां कमाल झाली ! त्या घरफोड्याला मी घरजांवई करीन होय ? आणि आमचंहि मुलगा होण्याचं वय कांहीं गेलं नाहीं अजून ! नाहीं तर तिसरं लग्न मीं केलं असतं काय ?

**मारवाडी :** हिनामदारसाहेब, तुमी आतां लगीन कशाला करते—बुड्ढल करा ! लगीन तो लई खराब ! तुमच्या घेरजमाई आला मंजे तुमी काशीला ज्या—कशाला आतां खटपट करते नकामीं !

**कचेश्वर :** हें बघ, ए मातीमल्ल का मोतीमल्ल, तुझ्या तिरोंडी टाळक्यांत जर कांहीं अक्कल असेल तर त्या डाकूच्या नादाला लागूं नकोस ! तो भयंकर दरवडे-

खोर आहे! त्याच्यावर सरकारी वारंट सुटलेलं आहे. तुझे चाळीस हजार रुपये गेले खड्डयांत! आतां तूं देशाला जा आणि तिकडे शेवगांठ्या, कुलपी मलाई, नाहीं तर बुढ्ढीके बाल विकत बस जा—

**मारवाडी** : (मोठ्यानें हंसत) गजब करते तुमी हिनामदारसाहेब! आतां आमी ज्याते. काल येईल फिरून! सच सांगते, तुमी नाटकांत ज्या—लई मजा करेल तुमी! अने तुमच्या समदा घर हमाला बघायच्या होता! किती खण हाय तुमच्या इमला!

**कचेश्वर** : चल चालता हो, नाहीं तर मारीन गचांडी!

**मारवाडी** : लई मजा करते तुमी, नाटकांत ज्या! घेरजमाईला बी गाली देते अने हमाला बी गाली देते! लय मजा करते!

[ हंसत हंसत जातो.

**कचेश्वर** : माझी प्रकृति पुन्हा ताळ्यावर यायला मला आतां किती बाटल्या काढा घ्यावा लागेल कुणास ठाऊक! या जाफराबादी टोणग्यानं माझ्या नांवावर आणखी काय काय घाण करून ठेवली आहे कोण जाणे! वाइटांतून चांगली गोष्ट एवढीच कीं, जर का हा हरामखोर माझ्या हातांत सांपडला तर सरकारनं लावलेलं एक लाख रुपयांचं बक्षीस तरी मला मिळेल! म्हणजे नवऱ्या मुलाला चतुर्भुज करून सासऱ्यानं वसूल केलेला हा पहिलाच हुंडा होईल!

[ चंडिराम रागारागानें प्रवेश करतो.

**चंडिराम** : तुम्हीच ते इनामदार ना! मग मीच तो जाफराबादचा जहागिरदार!

**कचेश्वर** : (घाबरून) काय! तूंच, तूंच जाफराबादचा जहागिरदार! अरे किशा, नागनाथ—

**चंडिराम** : विनाकारण बोंबलूं नका! काय हो मेहेरबान सासरे, तुमची माझ्यासंबंधानं कल्पना तरी काय आहे?

**कचेश्वर** : आणि राजेश्री घरजांवई, तुमची तरी माझ्याविषयीं काय समजूत आहे?

**चंडिराम** : तुम्हांला मी काय दुधखुळा वाटलों कीं काय?

**कचेश्वर** : आणि तुम्ही तरी काय मला गाढव समजतां कीं काय?

**चंडिराम** : मी कांहीं बोंडल्यानं दूध प्यालों नाहीं!

**कचेश्वर** : आणि आमच्या लहानपणीं कांहीं दुधाच्या बाटल्या नव्हत्या असं नाहीं!

**चंडिराम :** लग्न होत नाहीं म्हणून माझा कांहीं जीव चालला नाहीं !

**कचेश्वर :** आणि जांवई मिळत नाही म्हणून माझाहि प्राण कांही घाबरा झाला नाहीं !

**चंडिराम :** आमच्या जाफराबादला हव्या तितक्या मुली आणि म्हशी मिळतात !

**कचेश्वर :** आणि तुमच्यासारखे जांवई नळबाजारांत पैशाला पंचाहत्तर मिळतात !

**चंडिराम :** खोट्या गोष्टी सांगून मला फसवतां ? शोभत नाहीं हें तुमच्या वयाला आणि इभ्रतीला !

**कचेश्वर :** आणि माझी पोरगी पळवून नेण्याचं हें पाजी कारस्थान करतांना तुला तरी कांहीं शरम वाटली का ?

**चंडिराम :** कोणी तुमच्या पोरीला पळवून नेत नाहीं ! ठेवून द्या तिला नीट बरणींत आणि लोणचं करा तिचं ! तुमच्या पोरीला पळवून नेण्याइतका मी गाढव नाहीं ! तुमच्या गांवांतल्या लोकांची एवढी गैरसोय करण्याची मला हो काय जरूर ?

**कचेश्वर :** आणि तुझ्यासारख्या खुनी खाटकाच्या हातांत पोटची पोरगी देऊन तिच्या जन्माचा सत्यानाश करण्याची आम्हांला तरी काय जरूर ?

**चंडिराम :** तरी बरं ! दोन बायका मारून हात चांगला घटलाय म्हणून ! आतां तिसरीचा निकाल केव्हां लावणार ?

**कचेश्वर :** सहा बायकांच्या रक्तानं हात अजून कोपरापर्यंत रंगले नाहींत वाटतं ! आतां सातवीचा कडेलोट करणार का गळा दाबून जीव घेणार !

**चंडिराम :** साफ साफ खोटं आहे तें !

**कचेश्वर :** तें खोटं नव्हे—बोका–इ–बंगाल !

**चंडिराम :** ( घाबरून ) बोका–इ–बंगाल ! कोण बोका–इ–बंगाल ?

**कचेश्वर :** जहागिरदारसाहेब, ती आपली खरी किताबत आहे ! कां ? आतां का तोंड काळंठिक्कर पडलं ! आपल्या स्वदस्तुरचा कबुलीजबाब आतां आणूनच दाखवायला पाहिजे का ? आपण आजपर्यंत किती लग्नं केलींत, किती बायकांचा दयाळूपणानं जीव घेतलात, किती पोरीबाळी पळविल्यात—या गोष्टींचं आपणच करून ठेवलेलं टिपण आपण इतक्या लवकरच विसरलांत ! दरवडेखोर ! गळेकापू !

**चंडिराम :** अरे थेरड्या ! म्हणजे या सर्व कारस्थानाच्या मुळाशीं तूं आहेस अशी जी मला शंका आली ती खरी आहे तर ! काल त्या घरांत मला फसवून

नेऊन माझ्याकडून बळजबरीनं तो खोटा कबुलीजबाब लिहून घेण्याचा तो हलकट कट तुझाच होता एकूण !

**कचेश्वर :** असला डांबीस कांगावा कोणापुढं करतोस ? स्टेशनवर उतरल्यानंतर इथं न येतां तूं एका सभ्य माणसाच्या कुटुंबांत शिरून त्याच्या तरुण मुलीचा हात बेशरमपणें धरलास हें काय मला माहीत नाहीं ?

**चंडिराम :** तें सारं तुझंच बनावट कारस्थान ! सभ्य माणसाच्या घराचं तूं वर्णन करूं नकोस ! तरी बरं, कालच रात्रीं तुझ्या घरांत दडून बसलेले ते दोन जिवलग यार पोलिसांनीं पकडून नेले आहेत !

**कचेश्वर :** खोटं आहे तें ! माझ्या पोरींचा अन् त्यांचा कांहीं एक संबंध नाहीं !

**चंडिराम :** त्या संबंधाची माहिती साऱ्या गांवाला झाली आहे आतां ! नशीब समज, तुझी पोरगी आजपर्यंत त्यांच्याबरोबर पळून गेली नाहीं हें !

**कचेश्वर :** पोरींना हातोहात पळवून नेण्याची हलकट कला तुझ्याइतकी इतरांना अद्याप साधली नाहीं ! प्रत्येक वेळां वीस हजार रुपये भरून भानगडी मिटत नसतात ! असला बेशरमपणा करून फिरून माझ्या घरांत पाऊल टाकतोस !

**चंडिराम :** तुझं घर ! त्या मोतीमल मारवाड्याकडे चाळीस हजाराला गहाण पडलं तरी तुझंच घर का !

**कचेश्वर :** पाजी माणसा ! माझा घरजांवई होणार अशी थाप मारून तूं हें घर परस्पर त्या मोतीमलकडे चाळीस हजार रुपयाला गहाण टाकलंस काय ?

**चंडिराम :** असलीं हलकट कारस्थानं करून माझी इस्टेट घशांत पडेल अशी तुझी समजूत आहे काय ! थांब, असाचा असा पोलिसाकडे जातों—

**कचेश्वर :** जा, खुशाल जा, म्हणजे दोन वर्षं तूं चुकवीत असलेलं वारंट तरी ते तुझ्यावर बजावतील ! पण थांब, तूं पोलिसाकडे जाण्याच्या आधीं मीच तुला तेथें नेऊन गुदरतों ! एक लाख रुपये आपण होऊन घरांत चालत आले असतां ते सुखासुखी दवडण्याइतका मी गाढव नाहीं !

**चंडिराम :** एक लाख रुपये ! कसले एक लाख रुपये !

**कचेश्वर :** तुला जिवंत पकडण्यासाठीं सरकारनं बक्षीस म्हणून लावलेले—कां दचकलास ? कवडी किंमतीच्या माणसासाठीं सरकार एक लाख रुपये दवडायला तयार झालं आहे हें ऐकून तुला आश्चर्य वाटलं ! मेहेरबान, हें जाफराबादी कातडं आतां फेंकून द्या ! तुमच्या पापाचा घडा आतां काठोकांठ भरला !

[ चंडिरामाला धरावयास पुढें जातो.

**चंडिराम :** मागं सर, माझ्या अंगाला हात लावूं नकोस! महारोग जडवून घेण्याची मला इच्छा नाहीं!

**कचेश्वर :** महारोग—कुणाला झाला आहे महारोग?

**चंडिराम :** तुम्हांला महाराज! जो लपविण्यासाठीं गेलीं चाळीस वर्षं सकाळ-संध्याकाळ तुम्हीं काढ्याचीं मडकीं तोंडाला लावून बसला आहांत तो! अशीं औषधं घेऊन का कुठं रोग लपतात? पाण्यांत टाकलेली घाण कधीं तरी कांठाला लागणारच!

**कचेश्वर :** अरे जाफराबाद्या, मला महारोग झाला आहे काय! तुझ्या डोळ्यांना काय रक्तपिती झाली आहे वाटतं! थांब आतां, पोलिस आले म्हणजे तुझे डोळे साफ होतील.

[ नेत्रा येते.

**नेत्रा :** बाबा! ( चंडिरामास बघून ) अं! हें कोण?

**चंडिराम :** ( स्वगत ) हेंच दिसतं आहे आमचं कुटुंब! आतां दोन पावलं मागंच सरावं! नाहीं तर बया माझा हात धरून मला घरांत घेऊन जायची!

**कचेश्वर :** हाच तो जाफराबादचा—( थांबून ) पण तुला काय करायचंय? जा तूं.

**नेत्रा :** म्हणजे तुम्हीं माझं यांच्याशीं का लग्न ठरवलं आहे? ( स्वगत ) आतां अशीच गम्मत करावी. ( उघड ) खरंच बाबा, तुम्ही किती चांगले आहांत!

**कचेश्वर :** नेत्रा, तूं आधीं घरांत जा!

**नेत्रा :** बाबा, काल मी उगीच तुम्हांला बोललें! तुम्हीं ठरवलेलं हें लग्न मला अगदीं पसंत आहे!

**चंडिराम :** ( स्वगत ) म्हणजे लग्न ही संस्था हिला मंजूर आहे एवढी तरी मेहरबाननीच आहे म्हणायची!

**कचेश्वर :** नेत्रा, हें लग्न मोडलं! हा माणूस दरवडेखोर आहे! यानं आतांपर्यंत सहा बायकांचे खून केले आहेत!

**नेत्रा :** इश्श! बाबा, आतां उगाच थट्टा करूं नका! बायका मारायच्या म्हणजे काय माशा मारायच्या आहेत! मला किनई हे पाहिल्याबरोबर आवडायला लागले!

**चंडिराम :** ( स्वगत ) प्रत्येक नवीन पुरुषाबद्दल हिचं असंच मत होतं कीं काय? बेशरम! बापासमोर ही भाषा.! हें प्रेक्षणीय स्थळ पाहाण्यासाठीं उगाच नाहीं या घरांत तरुणांची जत्रा भरत!

**कचेश्वर :** नेत्रा, होतेस कीं नाहीं चालती?

**नेत्रा** : करीन तर करीन–यांच्याशींच लग्न करीन !

**चंडिराम** : अहो सौभाग्यकांक्षिणी, लग्न या प्रकारांत दोन जिवांचा संबंध येतो हें ध्यानांत आहे ना ! तुमचं होईल लग्न पण आमचा जाईल जीव ! तुमच्याशीं लग्न करून संसाराची सहकारी पतपेढी बनविण्याचा माझा विचार नाहीं !

**कचेश्वर** : ए, तुझा जाफराबादी हलकटपणा पुरे कर !

**चंडिराम** : आणि शिवाय, मी कितीहि हौशी असलों तरी बायकोच्या ओठावर उठलेल्या कोडाचं कोडकौतुक करण्याइतका शृंगार मला साधायचा नाहीं !

**कचेश्वर** : कोणाच्या ओठावर कोड उठलंय ?

**चंडिराम** : या—तुम्ही आमच्यासाठीं नेमस्त केलेल्या वधूच्या ! नाहीं तर हिनं आपल्या ओठावर तो चार इंची तांबडा गिलावा कशाला केला आहे ! बाप महारोगी आणि पोरगी कोडी !

**नेत्रा** : काय, मला कोड आहे ? कोडगा मेला ! तोंड रंगवूं का चांगलं !

**चंडिराम** : नाहीं, आपलं तोंड रंगवतां तितकं पुष्कळ आहे कीं !

**कचेश्वर** : ( नेत्रास ) तूं नको त्याच्या तोंडीं लागूं !

**चंडिराम** : आणि मी तरी हिच्या तोंडी कशाला लागतोंय ! हिच्या तोंडी लागून स्वतःचें तोंड रंगवून घेण्याची माझी इच्छा नाहीं !

**कचेश्वर** : तुझ्यासारख्या माणसाला तोफेच्या तोंडीं द्यायला पाहिजे !

**चंडिराम** : म्हणजे, तुमच्या त्या महांकाळीच्या ? मग मला पोबाराच केला पाहिजे !

**कचेश्वर** : कोण महांकाळी !

**चंडिराम** : तुमचं कुटुंब ! मुलगी मुलुखमैदान आणि आई महांकाळी !

[ विद्यागौरी येते.

**विद्या** : ( रागानें ) काय मी महांकाळी ! हा कोण निर्लज्ज धटिंगण इथं माझी निंदा करतोय ?

**नेत्रा** : हेंच तें जाफराबादचं जनावर ! यांच्याच गोठ्यांत बाबांनीं मला बांधायचं ठरवलं होतं. कालपासून वाट पाहातां पाहातां आज उगवलं !

**विद्या** : अरे मेल्या, घरांत पाऊल टाकल्याबरोबर सासूची निंदा करतोस ? फोडूं का थोबाड ! ( कचेश्वरास ) आणि काय हो, तुम्ही खुशाल माझी निंदा निर्लज्जपणें इथं ऐकत बसलां आहांत ! कांहीं लाज वाटते आहे का ! कां आतां सासरे होणार म्हणून त्या आनंदानं डोकं फिरलं आहे तुमचं ?

**कचेश्वर :** तूं बोलूं नकोस ! तें लग्न मोडलं ! हा अस्सल डाकू आहे !

**विद्या :** अग नेत्रा, धांव, घरांतून पंचारती घेऊन ये !

**नेत्रा :** ती कशाला ?

**विद्या :** अग, तुझ्या बापाला फार वर्षानीं अक्कल आली म्हणून ओवाळायला नको का त्यांना ! अहो, म्हटलं माझ्या आधी पाया पडा ! घ्या बायकोच्या पायाचं तीर्थ ! आधींच बायकोचं ऐकलं असतं म्हणजे असा फजितवाडा तरी झाला नसता !

[ रेखा येते व एकदम कचेश्वराचे पाय धरते.

**रेखा :** काकासाहेब, काकासाहेब—

**विद्या :** अगबाई, ही कोण ! !

**कचेश्वर :** आणि माझे पाय कशाला धरते !

**रेखा :** काकासाहेब, मी काय सांगूं ! त्यांनाच विचारा मी कोण तें !

**कचेश्वर :** म्हणजे, याची ती सातवी बायको आहे ती तूंच कीं काय ?

**रेखा :** होय महाराज !

**चांडिराम :** कोण, तूं माझी बायको ! ( रेखेला नीट पाहून ) अरे बापरे ! ( स्वगत ) ही कालची कारटी फिरून माझा जीव घ्यायला आली काय इथं !

**कचेश्वर :** कां, आतां कां तुझी बोबडी वळली ? घे आतां ! हा सूर्य आणि हा जयद्रथ !

**रेखा :** महाराज, मी यांच्या जाळ्यांतून निसटून पळालें म्हणूनच आतांपर्यंत कशी तरी वांचलें ! नाही तर मी माझ्या सहा सवतींच्या भेटीला कधींच गेलें असतें !

**चांडिराम :** साफ, साफ खोटं ! आतां काय सांगावं ! तुम्हांला हें खरं वाटतं ?

**विद्या :** अगदी खरं आहे तें ! पुरुषांची जातच दुष्ट ! ये बाई तूं !

[ रेखेला कुरवाळून जवळ घेते.

**रेखा :** आईसाहेब, तुम्ही आपली मुलगी आणखी यांच्या गळ्यांत घालून तिचा सत्यानाश करूं नका !

**कचेश्वर :** छे छे, ती तूं काळजीच करूं नकोस. मी त्याला आतां पोलिसाच्याच ताब्यांत देतों !

**रेखा :** ( कचेश्वराचे फिरून पाय धरते. ) नका, नका, महाराज, तुमच्या या गरीब मुलीला अनाथ करूं नका ! तिला एवढं चुडेदान द्या ! किती झालं तरी ते माझे पति आहेत ! ते दुष्ट असतील, खुनी असतील, दरवडेखोर असतील—

**चंडिराम :** आतां काय करावं ! काय बेशरम पोरटी आहे ही ! काय ग ए ! कांहीं लाजलज्जा आहे का तुला ? काल तूं त्या थेरड्याची पोरगी होतीस आणि आज तूं माझी सातवी बायको कुठून झालीस ?

**रेखा :** नाथ, मी तुमच्या पाया पडतें ! अजून तरी ताळ्यावर या. दयाळू परमेश्वर अजून तुम्हांला क्षमा करील ! आतां आणखी लग्न करून गरीब पोरींचे गळे कां कापतां ? जिवाच्या जिवलगा —

[ चंडिरामाचे जवळ जाऊन त्याचे पाय धरते.

**चंडिराम :** चल हो दूर ! अरे वा रे वा जिवाच्या जिवलगा ! ( स्वगत ) आतां इथं क्षणभर उभं राहिलं तर आणखी पांचपंचवीस बायका माझ्यावर नवरेपणाचा हक्क सांगायला यायच्या, आणि हा जिवाचा जिवलग इथंच जिवानिशीं ठार व्हायचा !—नाहीं तर ते पोलीस येऊन मला पकडायचे ! ( उघड ) हृदयेश्वरी, हें घे तुझ्या पतिभक्तीचं बक्षीस.

[ लाथ मारून पळून जातो.

**रेखा :** हाय रे दैवा ! नाथ, नाथ ! !

[ मूर्च्छित पडण्याचें सोंग करतें. विद्यागौरी व नेत्रा तिला सावध करतात.

**कचेश्वर :** अरे किशा—किशा —पकड, पकड, चोर पळाला ! धांव !

**विद्या :** जिवंत जाळलं पाहिजे साऱ्या नवऱ्यांना !

**कचेश्वर :** काय म्हणालीस ? ( किशा येतो. ) अरे, बघतोस काय ? पकड, पकड ! ( किशा कचेश्वरला पकडतो. ) अरे मूर्खा, मला नाहीं त्या दरवडेखोराला ? गेलाच तो ! हात गाढवा ! एक लाख रुपयांचं बक्षीस घालवलंस !

[ किशा आ करून बघतो. पडदा पडतो.

# ४

कचेश्वराचें घर. किशा हातांत बऱ्याचशा औषधांच्या बाटल्या व डब्या घेऊन प्रवेश करतो.

**किशा :** ह्ये मलम हाय का चाटण हाय ह्ये बी कळत न्हाई ! अन् ह्ये पोटाला लावायचं वखद हाय का पोटांत घ्यायचं वखद हाय ह्ये बी उमगत न्हाई ! अन् ह्या खोकल्याच्या गोळ्या हायेती का जुलाबाच्या गोळ्या हायेती ह्ये बी समजत न्हाई ! समदी वखदं थोडथोडी घ्येवींत ! म्हनजी जात्याल आपलीं जिथल्या तिथं !

[ एक कांचेचा पेला घेतो त्यांत थोडथोडी औषधें घालतो व त्यांत पाणी घालून मिश्रण तयार करतो. मग त्याचा दोनतीन वेळां वास घेऊन एक घोट घेतो व तावडतोब तो थुंकून टाकतो.

थूः—थूः—थूः—

[ कचेश्वर खोकत खोकत येतो.

**कचेश्वर :** किशा, काय रे तें ? ( किशाच्या हातांतला प्याला पाहून ) गाढवा, माझीं औषधं चोरून पितोस काय ?

**किशा** : न्हाई, धनीसाहेब, कालपून जिवाला बरं न्हाय म्हून वखद घेत व्हतों !

**कचेश्वर** : म्हणजे तूं स्वतः डॉक्टर बनलास कीं काय ? गद्धया, तुला पानथरी पोटांत होते का पायाला होते हें कळत नाहीं ! आणि औषधं कसलीं घेतों आहेस भलभलतीं ! हें काय ओतलंयस ग्लासांत ?

**किशा** : हीं समदीं वखदं यामंदी वाइच घातलीं हायतीं !

**कचेश्वर** : काय–हीं सारीं औषधं ? किशा, मूर्खा, मरायचंय काय तुला ? काय रे हें ? हें मलम, चाटणं, एरंडेल तेल, सार्सापरीला आणि जुलाबाच्या गोळ्या ! आणि गंपलासच्या पट्टीचा तुकडाहि हा तरंगतो आहे ! ओत, ओत, हें बाहेर नेऊन ! जगांतले सारे दवाखाने जरी तुला विसळून पाजले तरी तुला अक्कल यायची नाहीं कधीं. आली ही उबळ ! [ एका खुर्चीवर खोकत बसतो. किशा ग्लास घेऊन जातो व औषध ओतून परत येतो. ] दोन दिवस झाले, आतां आमचं कांहीं चिन्ह ठीक दिसत नाहीं ! लवकरच संपणार आमचा अवतार असं दिसतंय ! किशा, अरे तो नागनाथ अजून कां आला नाहीं ? कुठं वैद्य आणायला गेला आहे कोणास ठाऊक ? नाही तर कुठला तरी एखादा दांतपडका वैद्य घेऊन हा परत यायचा ! दांतपडका वैद्य देखील एक वेळ पुरवला, पण डॉक्टर आतां औषधाला सुद्धां नको !

[ नागनाथ पुढें व मागून मद्रासी वैद्याचें सोंग घेतलेला अरविंद व पठाणाचें सोंग घेतलेला निरंजन हे प्रवेश करतात.

**नागनाथ** : काकासाहेब, हेच ते त्रिचनापल्लीचे सुप्रसिद्ध वैद्य दद्रुगजकेसरी !

**कचेश्वर** : कोण, दद्रुगजकेसरी ? नांव ऐकल्यासारखं वाटतं !

**नागनाथ** : म्हणजे, प्रत्येक वर्तनमानपत्रांत यांचं नांव छापून येत असतं ! कोठलंहि वर्तमानपत्र उघडून वाचा कीं ! यांना दक्षिण हिंदुस्थानांत धन्वंतरी-मिंडू असें म्हणतात ! यांनीं तामीळ व तेलगू भाषेंत वैद्यकशास्त्रावर हजारों ग्रंथ लिहिले आहेत ! तामीळ भाषेंत तर एक म्हण देखील झाली आहे, की 'यरकुल्ली येणकुंद्री दद्रुगजकेसरी मारकुंडा !' म्हणजे, मरायचं असलं तरी दद्रुगजकेसरीच्या हातून मरावं ! काय वैद्यमिंडा, इंडरि वन्नमाड्डू ?

**अरविंद** : भाळ हळ्ळी !

**नागनाथ** : दुर्दैवानं यांना मराठीचं एक अक्षरहि येत नाहीं !

**कचेश्वर** : या वैद्यराज, बसा. काय नांव म्हटलंत, दद्रुगजकेसरी ? नांव फार लांब आहे ! आम्हीं आपलं तुम्हांला दद्रुअय्या म्हणत जाऊं म्हणजे झालं !

**नागनाथ :** ( अरविंदास ) वैद्यमिंडा, इंदि बंदुमाड्डु मेनगुंडि काकासाहेब इनामदारु. भाळमुंडि नहावगंड्डु !

**कचेश्वर :** भाळमुंडि न्हावगंड्डु ! अरे, काय रे, मला न्हावगंड म्हणतोस कीं काय ?

**नागनाथ :** काकासाहेब, यांच्या भाषेंत विद्वान् माणसाला नहावगंड्डु म्हणतात !

**कचेश्वर :** काय विद्वान माणसाला न्हावगंड्डु म्हणतात ! मग न्हाव्याला काय यांच्या भाषेंत पंडितगंड्डु म्हणतात ?

**अरविंद :** भाळमुंडि नहावगंड्डु ? दर्शनमाद्रि आनंद चिंडा ! भाळमुंडि आनंद चिंडा ?

**नागनाथ :** ( कचेश्वरास ) वैद्यराज म्हणताहेत कीं तुमच्यासारख्या विद्वान लक्ष्मीपुत्राच्या दर्शनानं आम्हांला अत्यंत आनंद झाला आहे !

**अरविंद :** भाळ हळ्ळी, भाळ हळ्ळी !

**कचेश्वर :** छेः छेः, उलट वैद्यश्रेष्ठ, आपल्यासारखे दक्षिण हिंदुस्तानचे धन्वंतरी आमच्या घरीं आल्यानं आमचंच घर पवित्र झालं आहे !

**नागनाथ :** ( अरविंदास ) काकासाहेब वन्ना, दक्षिण हिंदुस्थानकुद्रि धन्वंतरीमिंडा इद्र आगमनमाद्रि चिल्लकुट्ट भाळ पवित्र चिंडा !

**अरविंद :** नाळकुंडा धन्वंतरीमिंडा, इंदुइल्लू वैद्यालिंडु अय्या !

**नागनाथ :** आणि दरवाजावरच्या पहाऱ्यासाठीं हा एक पठाण आणलेला आहे ! कालच हा अफगाणिंस्तानांतून इथं आलेला आहे !

**कचेश्वर :** फारच छान ! पहाऱ्याच्या कामाला पठाणच पाहिजे ! हीं हिंदु लोकांचीं कामं नाहींत आपल्या ! असला माणूस जर परवां दरवाजावर असता तर तो जाफराबाद्या, काय बिशाद हातांतून निसटला असता !

**नागनाथ :** ( निरंजनास ) गफूर, काबूलकंदाहार जाकोबाबाद औरंगाबाद.

**निरंजन :** मालिक ! दिवाण—इ—खास—दिवाण—इ आम—कुतुबमिनार-इस्तंबूल !

[ सलाम करून जातो.

**कचेश्वर :** नागनाथ, माझी प्रकृति कालपासून इतकी ढासळली आहे कीं मला नाहीं वाटत आतां मी फार दिवस जगूं शकेन. वैद्यराजांना म्हणावं माझी प्रकृति उत्तम तपासा आणि, अशी एकच कांहीं तरी दिव्य संजीवनी द्या कीं, फिरून

जन्मांत रोग होतां कामा नये मला ! कंटाळा आला मला या औषधांचा आणि रोगांचा !

**नागनाथ :** वैद्यमिंडा, काकासाहेब वन्ना भाळ इष्टि नाळ जिंटा ! किंदु प्रकृति चिल्लमिंद्या संजीवनी औदु चिल्ला !

**अरविंद :** चिंद गद्धा वन्या भाळ इष्टि नाळ जिटा ? नाळमाडु काकासाहेबगळ्ळी अमरकिंदऱ्या लिंपु वैद्यचिंदु बहाळहंट्या !

**नागनाथ :** वैद्यराज म्हणताहेत, तुम्हाला अमर नाही केलं तर वैद्यकी सोडून देईन !

**अरविंद :** या, वैद्यचिंदु बहाळहंट्या !

**कचेश्वर :** काय, मला अमर करून टाकीन म्हणतो ? टाक टाक म्हणावं ! म्हणजे या जन्ममरणाच्या फेऱ्यांतून तरी एकदांची सुटका होईल !

**अरविंद :** यंदु अप्पा, इन्न सहस्र रुपया माडचिल्ला !

**नागनाथ :** पण म्हणतात कीं औषधाची फी वीस हजार रुपये पडेल !

**कचेश्वर :** काय वीस हजार रुपये ! अरे, मी आज चाळीस वर्षे काढा घेतो आहे, त्याची किंमत आजपर्यंत दोनचारशें रुपयांपेक्षां जास्ती झाली नसेल ! वीस हजार रुपयांत गांवांतले झाडून सारे दवाखाने डॉक्टरासकट खरेदी करतां येतील ! वीस हजार रुपये देऊन अमर होण्यापेक्षां दोन आण्याची अफू घेऊन ही सगळीच कर्मकटकट कायमची मिटवलेली काय वाईट ?

**नागनाथ :** वैद्यमिंडा, इन्न सहस्र रुपिया भाळमुंडि चिंडा ! इंपु नाडु चिंद्या !

**अरविंद :** इंपु नाडु चिंद्या ! बहाळहंट्या ! इन्न सहस्रमादु हडुनाळ भाळ चिन्या ! नाळकिंदु, त्रिचनापल्ली हट्टपचा !

**नागनाथ :** वीस हजार रुपयांतील एक पै कमी होणार नाहीं, नाहीं तर त्रिचनापल्लीला चालता होईन, म्हणताहेत ! काकासाहेब, मला वाटतं वीस हजार कांहीं फार नाहींत. नाहीं तरी त्या जाफराबादच्या जहागीरदाराला वीस हजार रुपये हुंडा द्यावयाला तयार झाला होताच कीं नाहीं ? तेच पैसे यांना दिले असं समजा ! असले धन्वंतरी फिरून कसचे इकडे येतात ? तुम्हीं आतां हो तर म्हणा ! गुण आल्यावर पुढचं पुढं पाहूं ! नाहीं तरी आतां थोडेच पैसे द्यायचे आहेत यांना !

**कचेश्वर :** बरं, तूं म्हणतोस तर तसं का होईना ! परवां तो दरवडेखोर जर हातीं लागला असता तर एक लाख रुपये बक्षीस मिळून त्यांतले वीस हजार

रुपये नसते देतां आले का या वैद्याला? ठीक आहे—चला, तपासा म्हणावं त्यांना!

**नागनाथ :** वैद्यमिंडा, काकासाहेबगळ्ळी प्रकृति चिह्लमिंदी!

**अरविंद :** भाळ हळ्ळी! किंदु, इन्न सहस्त्र रुपया माडचिल्ल्या!

**नागनाथ :** या, या, इन्नसहस्त्र माडचिल्लू! नाडचेट्टि इप्पु!

**अरविंद :** भाळकुंडी ओक्कु, अय्या! (काकासाहेबास) नहावगंडु अय्या, इष्टि प्रकृति चिह्लमिंदु! नाड इंताडू.

[ काकासाहेबांची नाडी पहातो.

**कचेश्वर :** अरे, काय चमत्कार आहे पहा! यांनीं अंगाला हात लावतांच मला एकदम बरं वाटूं लागलं!

**नागनाथ :** अहो, अजून थांबा! अश्विनिकुमाराचे बाप आहेत हे! मग मी काय उगीच सांगत होतों काय?

**अरविंद :** अय्यायो, नाळकुद्रि नाडमिंडु!

**नागनाथ :** इंडरि मिंडा? नाळकुद्रि नाडमिंडु? कमाल आहे! काकासाहेब, वैद्यराज म्हणतात की तुमच्या शरिरांत मुळी नाडीच नाहीं!

**कचेश्वर :** म्हणजे नाडीशिवाय जगलों आहे कीं काय मी!

**अरविंद :** हृद्दू इंताडू. (काळीज पहातो) मारत्या, भाळमुंडि चमत्कारं! हृद्दू इल्ला ओंदु ओंदु चिंपा!

**नागनाथ :** इंडरि अप्पा? ओंदु ओंदु चिंपा? अहो काकासाहेब, वैद्यराज म्हणतात तुमच्या काळजाला एवढीं एवढीं भोकं पडलीं आहेत!

**कचेश्वर :** काय माझ्या काळजाला एवढीं मोठीं खिंडारं पडलीं आहेत! हरे राम! अरे, म्हणजे मग मी जगलों तरी कसा! नाडीचा पत्ता नाहीं आणि काळजाला तळहाताएवढीं भगदाडं!

**अरविंद :** प्राक्तनमाद्रि जिंटा अप्पा, प्राक्तनमाद्रि जिंटा! नाळकुंदी अद्दु माड्डु, मारकुंडा भाळमुडदा!

**नागनाथ :** काय, भाळमुडदा! अरे बापरे! वैद्यराज म्हणताहेत केवळ प्राक्तना-मुळें तुम्हीं जगलांत. आज जर हे इथं आले नसते तर उद्यां संध्याकाळपर्यंत तुमचा सपशेल निकाल लागला असता!

**कचेश्वर :** काय उद्यां! अरे देवा! तरी मी सगळ्यांना जीव तोडून सांगतों आहें कीं, बाबांनो, माझी प्रकृति भयंकर बिघडली आहे; मला चिन्ह कांहीं घड

दिसत नाहीं; पण मानतो आहे कोण खरं ? आतां माझा उद्यां भाळमुडदा पडला असता म्हणजे मग बसले असते सारे बोंबलत ! अहो दद्रुअय्या, आणखी दहावीस रुपये घ्या जास्त, पण मला आतांचेआतां सपशेल दुरुस्त करून टाका !

**अरविंद** : नाडचेट्टि इप्पु अय्या ! संजीवनी औंदु अमर किंद्रया ! ( खिशांतून एक बाटली काढतो. ) अय्या, इंपु नाडु पिंदि ! इंपु नाडु पिंदि !

**नागनाथ** : वैद्यराज म्हणताहेत, या बाटलींतलं थोडसं घ्या !

**कचेश्वर** : थोडंसं ? आणा इकडे.

[ तोंडाला बाटली लावून सगळें औषध गटागट पितो.

**अरविंद** : इंपु नाडु अय्या ! संजीवनी इंदु !

**नागनाथ** : अहो, थोडं प्या ! थोडं प्या ! संजीवनी आहे ती !

**कचेश्वर** : संजीवनीच जर प्यायची तर ती थोडथोडकी कां प्या ? आणखी दीडशेर संजीवनी देखील पचवीन मी ! ( किंचित् थांबून ) अरेच्या, मला एकदम निराळं वाटूं लागलं कीं ! नाडी ? ( तपासून ) नाडी तर सत्तर मैलाच्या वेगानं धांवायला लागली. आणि छाती ? ( छातीवर हात ठेवून ) अं ! छाती तर पिठाच्या गिरणीप्रमाणं चालूं लागली फटाफट ! बुजलीं वाटतं सारीं भगदाडं !

**नागनाथ** : अहो, तुमच्या तोंडावरच्या सुरकुत्या देखील साफ विरल्या. केंस तर एकूण एक काळा झाला. आणि चारदोन दांत देखील तोंडांत फुटले असतील बघा !

**अरविंद** : अमृतपिंदि अय्या ! अमरकिंद्रया नाळघंटा !

**नागनाथ** : काकासाहेब, वैद्यराज म्हणतात तुम्हीं अमर झालांत !

**कचेश्वर** : काय मी अमर झालों ! रोगबीग पार साफ झाले ! उद्यां मरणार नाही—परवा मरणार नाहीं—कधीं मरणार नाहीं ! अहाहा, वैद्यराज, शाबास—( त्याला मिठी मारून ) न्हावगंडु अय्या—नाळघंटा अमरकिंद्रया बाळहंट्या ! नागनाथ—पुढल्या महिन्यापासून तुला दीड रुपया पगार वाढवला ! अहाहा, मी अमर झालों—अग ए, नेत्रा, नीरा, चित्रा—किशा—अरे, हीं सारीं मंडळी गेलीं कुठं ! इकडे मी अमर झालों आणि ही मंडळी कुठं मरायला गेलीं—

[ आंत जातो.

**नागनाथ** : काय रे ए, घातलं तरी काय होतंस त्या बाटलींत ?

**अरविंद** : गोमूत्र !

**नागनाथ** : काय गोमूत्र ?

[ हंसतो. विद्यागौरीला हातांनीं फरफटत ओढीत कचेश्वर येतो. मागून नेत्रा येते.

**कचेश्वर** : अग, मी अमर झालों—आतां जीव गेला तरी मी मरणं शक्य नाहीं! हें पहा—हें पहा—हे त्रिचनापल्लीचे दद्रुगजकेसरी–अत्यंत न्हावगंड्ड धन्वंतरी आहेत. अहो अय्या, बघा त्या बाटलींत कांहीं थोडसं औषध उरलं आहे का? आमच्या हिला देखील अमर करून टाका. आणखी पांचदहा रुपये जास्त घ्या! इतकं मधुर औषध मी जन्मांत प्यालों नव्हतों! काय? संपलं औषध! अहो, बाटली तरी विसळून आणा. नाहीतर तें बूच तरी हिला चाटायला द्या!

**विद्या** : अहो, किती जोरानं हात ओढलांत! तुम्हीं व्हा अमर! माझा कशाला जीव घेतां?

**कचेश्वर** : पण आधीं सांग, मी दिसतों कसा! अगदीं तरणाबांड दिसतों कीं नाहीं पंचवीस वर्षांचा! तोंडावर सुरकुती नाहीं कीं डोक्यावर पांढरा केंस नाहीं!

**विद्या** : पंचवीस का चांगले सतरा वर्षांचे दिसताय ना! सुरकुत्या जाऊन मुरमाच्या फुटकुळ्या देखील दिसायला लागल्या कीं तोंडावर! काय, टाळकं फिरलं काय तुमचं आज! का म्हातारचळ लागलाय! गिलावा पडलेल्या भिंताडासारखं थोबाड—आणि म्हणे, मी दिसतों कसा? तो जाफराबादचा टोणगा गेला आणि हा मद्रासचा तेल्या मारुती आला! (अरविंदास) काय रे ए, होतोस कीं नाहीं चालता इथून, का करूं टाळक्याचा कडबू!

**अरविंद** : इष्टि इंडि अम्मा! नोडदुल्ला बाळहंट्या!

**विद्या** : चल निघ मेल्या! घरांतून मुसळ घेऊन येते आणि तुझा चांगला बाळहंट्या करते!

**कचेश्वर** : ए, काय गाढव आहेस तूं—एवढा मोठा धन्वंतरी हा न्हावगंड्ड अय्या—याचा तूं अपमान करतेस! दहा जन्म घेतले तरी याचं ऋण फिटायचं नाहीं!

**विद्या** : कशाला दहा जन्माच्या खटपटींत पडतां आहांत! ही पोरगीच त्याच्या पदरांत टाका म्हणजे मुक्त व्हाल!

**कचेश्वर** : काय लाख बोललीस! आतांपर्यंत माझ्या डोक्यांत ही कल्पनाच कशी आली नाहीं कोणास ठाऊक! नागनाथ, अरे या धन्वंतरीला वीस हजार रुपये देण्यापेक्षां हें कन्यारत्न दिलेलं काय वाईट? असला अश्विनिकुमार जांवई

मिळाला तर औषधासाठीं पैसा खर्च करायला नको ! मग सकाळ संध्याकाळ आपण संजीवनीचाच रतीब लावूं की !

**नेत्रा :** बाबा, मला म्हणजे काय तुम्हीं माधुकरीची भाकरी समजतां कीं काय ? खबरदार माझ्या भानगडींत फिरून पडाल तर !

**कचेश्वर :** एक शब्द बोलूं नकोस ! वैद्यराज, वीस हजार रुपये इल्ला, आमची ही मुलगी तुम्हांला माडगुल्ला ! कबूल असेल तर आतांचे आतां लग्न लावून टाकूं !

**नागनाथ :** वैद्यमिंडा, इन्न सहस्र रुपिया मिंदु काकासाहेबगळ्ळी होडमुंडि माडचिल्ला !

**अरविंद :** होडमुंडि माडचिल्ला ! (नेत्राकडे बोट दाखवून) इंगा, इंगा ? (उडी मारून) व्यंकटरमणा गोविंदा ! होडमुंडि चिंडगुंडा ! अण्णा, होडमुंडि चिंडगुंडा !

**नागनाथ :** कबूल आहे त्यांना !

**विद्या :** कबूल नसायला काय झालं ? कावळ्याच्या नरड्यांत बासुंदी ओतली तर ओकारी येईल काय त्याला ? पहातेंच मी ! हा मद्रासी रामोशी लग्नाला कसा उभा राहतो आहे तें ! मोहोरीचें पलिस्तरच मारतें त्याच्या टाळक्यावर !

**कचेश्वर :** तूं कोण मला विचारणार ! आज मला इतका आनंद झाला आहे कीं काय वाटेल तें करीन मी ! नेत्राचं लग्न लावीनच लावीन ! पण मी देखील आणखी एखादं लग्न करीन ! नागनाथ, चल जा—हें लग्न आजचे आज झालं पाहिजे ! बघ, बाहेरून एखादा भटजी चालला असेल तर त्याला हांक मार ! शुभस्य शीघ्रम् !

**विद्या :** भटजी काय न्हाव्यासारखा रस्त्यांतून हिंडतो वाटतं ! अगदीं पुरतं फिरलं डोकं यांचं ! थांबा, मी मागीलदारच्या आडावरच जाऊन बसतें ! मंगळाष्टकाचा सूर तर निघूं द्या म्हणजे आडांतच उडी मारतें मी !

[ जाते.

**कचेश्वर :** जा, तूं गेलीस तरी कांहीं फिकीर नाहीं ! कमरेला सुपारी खोंचून मी देवक बसवीन ! नागनाथ, बघतोस काय ? जा ! (नागनाथ जातो.) आतां या कपाटांतलीं सगळीं औषधं, अरिष्टं, गोळ्या अन् मलमं अन्—झाडून साऱ्या बाटल्या रस्त्यावर फेंकून देतों !

[ जातो.

**नेत्रा :** बाबा, बाबा —

**अरविंद :** इष्टि इंडि अम्मा, होडमुंडी चिंडगुंडा !

**नेत्रा :** चल, नीघ—लोचट मेला ! फाजीलपणा करशील तर मारीन गालफडांत !

**अरविंद :** आवडत्या माणसाच्या हातून थोबाड रंगवून घेण्याला देखील भाग्य लागतं, नेत्रा !

**नेत्रा :** कोण अरविंद ? काय लबाड आहेस रे ! इतका चेहेरा बदललास ! आणि ही भाषा कुठं शिकलास ?

**अरविंद :** तुझ्या प्रेमानं शिकवली मला ? मी काय बोललों त्यांतलें मला एक अक्षर कळलं असेल तर शपथ ? अशीं गालफडं दुखताहेत मघापासून ! आणखी दोन दिवस ही भाषा मी बोलत राहिलों तर माझी बत्तिशी अगदीं साफ होईल !

**नेत्रा :** अगबाई, तो मेला पंडित आला वाटतं ? नीराची अगदीं पाठ पुरवलीन त्यानं ?

[ जातात. नीरा पुढें व मागून भुलेश्वर हातांत वर्तमानपत्र घेऊन प्रवेश करतो.

**नीरा :** आतां जीव कां घेतां माझा ? मागं नेत्रानं ज्ञानकोश तुमच्या डोक्यावर मारला तसा हा आतां अमरकोश मारून तुम्हाला अमरलोकाला रवाना करूं काय ?

**भुलेश्वर :** आतां नाहीं मी तुम्हांला ते श्लोक पाठ म्हणायला लावीत ! थोडंसं सामान्य ज्ञान देतों. ऐका तर खरं ! ( वाचतो ) " माणसाला माकड :—कांजीवरं तालुक्यांत पंचीवडनापुरं येथें एका कोष्ट्याची बायको बाळंत होऊन तिला माकडाचें पिलूं झालें ! त्याच्या नाकावर एक लहानसें शिंग असून त्याचें शेंपूट एकपूर्णांक दोनसप्तमांश इंच लांब होतें ! माकडापासून माणसाची उत्पत्ती झाली आहे या शोधाला या गोष्टीनें आतां जबरदस्त धक्का बसला आहे ! " आतां दुसरी बातमी : " शेळीला शिंगरूं झालं ! तीन डोकीं व चार पाय ! "

**नीरा :** पुरें करा तुमचं हें सामान्य ज्ञान ! काय, वाचतां काय हें !

**भुलेश्वर :** वर्तमानपत्रांत छापून आलेल्या बातम्या आहेत या ? खऱ्या आहेत अगदीं ! हें बघ—

[ वर्तमानपत्र दाखवतो.

**नीरा :** आग लावा असल्या वर्तमानपत्रांना ! शेळीला शिंगरूं आणि सिंहाला पारडूं झाल्याच्या त्या बातम्या छापण्यापेक्षां त्या पत्राच्या संपादकाच्या डोक्यावर शिंग फुटल्याची किंवा बातमीदारांना शेंपटें उगवल्याची बातमी कां छापून येत नाहीं ! चला, मला आतां कांहीं वाचून दाखवूं नका !

**भुलेश्वर :** आतां अगदीं एकच मिनीट! तें कालचं व्याकरण तसंच शिकवायचं राहिलं ना? तेवढं संपवितों! हें पहा, प्रथम मी एक साधं वाक्य घेतों! "हे सुंदरी, माझं तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे" या वाक्यांत 'सुंदरी' हें संबोधन, 'माझं' ही षष्ठी विभक्ती बरं का! आणि 'प्रेम' हें भाववाचक नाम!

**नीरा :** आणि तुम्ही कोण?—'क्रियाविशेषण'?

**भुलेश्वर :** नाहीं, 'तुम्ही' हें सर्वनाम! आतां दुसरें वाक्य. "आपण दोघे या घरांतून पळून जाऊं."

**नीरा :** चला, चावट कुठले!

**भुलेश्वर :** अग, पण हें मी म्हणत नाहीं तुला! हें व्याकरणांतलं वाक्य आहे! गैरसमज करून घेऊं नकोस! आतां या वाक्यांत 'पळून' हा शब्द महत्त्वाचा आहे! कसे जाऊं तर पळून जाऊं. कोण जाऊं तर आपण दोघे! कुठून जाऊं तर घरांतून! कळलं! आतां तिसरं वाक्य! "मीं तिचा हात धरला."

[ तिचा हात धरतो.

**नीरा :** हें काय, सोडतां कीं नाहीं माझा हात!

**भुलेश्वर :** थांब, मी तुला एवढा प्रयोग शिकवतों!

**नीरा :** असले चावटपणाचे प्रयोग शिकवूं नका मला!

**भुलेश्वर :** चावटपणा कसला? व्याकरणांतला प्रयोग आहे चांगला हा! तर सांगायची गोष्ट अशी कीं 'मीं तिचा हात धरला' हा कर्तरी प्रयोग आहे!

[ हातांत सोटा उगारलेला असा पठाणाच्या वेषांतील निरंजन एकदम प्रवेश करतो.

**निरंजन :** आणि हा घे कर्मणि प्रयोग! 'पठाणानें पंडिताला पिटलें' हरामखोर, नूरजहान अनारकली, मुमताजमहाल—निकल जाव! गोसकुर्माकबाबकालिजा-पायाभेजा!—फिरून या घरांत दिसलास तर या सुऱ्यानें—तुमारी गर्दन काटुंगा, हड्डी फोडुंगा!—खिमा करूंगा!

**भुलेश्वर :** अरे बापरे—

[ पळून जातो.

**नीरा :** कोण निरंजन! अगबाई पठाण!

[ डोळे मिटून निरंजनाच्या कंबरेला मिठी मारते.

**निरंजन :** पठाणाला घाबरलीस! आणि फिरून त्यालाच मिठी मारलीस! हात् वेडे!

*

**नीरा** : पठाणाचा पोषाख केलांत म्हणून पठाणासारखे माथेफिरू बनलांत होय ? त्या बिचाऱ्याच्या पोटांत सुरा गेला असता म्हणजे मग ?

**निरंजन** : मग काय तर—मघांपासून मी त्याचा तो फाजिलपणा पहात होतों ! शेवटीं त्यानं अगदीं लाजच सोडली ! तेव्हां मग माझं डोकं फिरलं. आजपर्यंत पंक्तिपठाण असलेला हा निरंजन आज तुझ्या प्रेमाचा पठाण झाला आहे ! तुझ्यासाठीं मी केवढा स्वार्थत्याग केला आहे याची तुला कल्पना आहे ? ( डोक्यावरचा पठाणी फेटा काढून ) हें बघ !

**नीरा** : म्हणजे शेंडी कापून टाकलींत कीं काय तुम्हीं !

**निरंजन** : मग काय तर ! प्रेमासाठीं शेंडीची आहुति देणारा मी पहिलाच प्रेमवीर ठरेन !

**नीरा** : आणि टाकून दिलींत का ती शेंडी ? मला गंगावन झालं असतं ना चांगलं !

**निरंजन** : अरेच्या, मला हें नव्हतं माहीत ! मी शेंडीची दाढी बनवली ! ही काय ! नीरा, प्यारी, चल—

[ नीरेचा हात धरून जातो. मागून किशा प्रवेश करतो.

**किशा** : ( तोंडावर हात ठेवून ) अग बया—बया—बया—! आतां या बामनाच्या पोरीनं अगदीं लाज सोडली ! पठाणांच्या हातामंदी हात देऊन खुशाल फिरतीया ! बदामपिस्ते खाऊनशान् ह्ये पठाण लोक इश्काच्या कामामंदी लई हुशार व्हत्यात ! पांच मिनिटांच्या आंत त्या पठाणानं त्या पोरीला फितविली ! आणि मी ! चार महिनं झालं ! ती मोलकरणीची पोर दाद बी देत नाहीं !

[ जातो.

## [ २ ]

पायापर्यंत बायकाचा बुरखा घेतलेला चंडिराम व त्याला हातांत धरून नागनाथ येतो.

**नागनाथ** : लाजूं नको—ये अशी—जपून—पुढं खड्डा आहे ! पाय मुरगळेल ! ये—नको लाजूं—आतां काढ बुरखा—

**चंडिराम** : ( बुरख्यांतून बायकोच्या आवाजानें ) पण कोणी बघत नाहीं ना इथं ? मला लाज वाटते.

**नागनाथ** : नको लाजूं आतां ! तुझं सौंदर्य बघायला कोणी नाहीं इथं !

**चंडिराम** : ( डोक्यावरचा बुरखा काढून ) अरे बापरे, आज अगदीं मरतां मरतां वांचलों !

**नागनाथ** : या बुरख्यामुळें वांचलांत ! नाहीं तर पोलिसांनीं कधींच पकडून तुम्हांला आतांपर्यंत फांशीं देखील देऊन टाकलं असतं ! काय शिताफीनं आणलं तुम्हांला त्या गर्दीतून काढून !

**चंडिराम** : तुमचे उपकार कसे मानावेत हेंच कळत नाहीं ! तुम्ही नसता तर त्या थेरड्याच्या कारस्थानांत मी पुरता सांपडलों असतों. आतां कांहीं करा आणि मला जाफराबादला कसें तरी सुरक्षित पोहोंचवा—

**नागनाथ** : त्याची तुम्ही काळजी करूं नका ! तुम्हांला पकडण्यासाठीं गांवांतून हजारों पोलिस वारंट घेऊन सैरावैरां पळतं आहेत. तेव्हां दमादमानेंच घेतलं पाहिजे ! अरे बापरे, हा आला वाटतं पोलिस ! बुरखा घ्या ! बुरखा घ्या ! ( चंडिराम बुरखा घेतो. थोड्या वेळानें नागनाथच पोलीशी आवाज काढून बोलूं लागतो. ) 'कोण आहे तें ?'—कोणी नाहीं जमादारसाहेब, बायको आहे माझी !—'मग सगळ्या अंगावर बुरखा कां घेतला आहे ?'—नाहीं साहेब, नुकतंच लग्न झालं म्हणून, लाजते आहे ती !—'खोटं बोलतोस तूं—बोका—इ—बंगाल नांवाचा दरवडेखोर जो पळून गेला आहे तोच दिसतो आहे हा !—अरे हरामखोरा, बायकांचं सोंग घेऊन पळतोस काय !' ( चंडिरामाला मारतो ) अहो—बायको आहे माझी ही एकुलती एक ! मारूं नका तिला !

**चंडिराम** : मेलों मेलों—मेलें–मेलें !

**नागनाथ** : 'खास पुरुषच आहे !'—नाहीं हो, बायको आहे माझी—'मग मेलों मेलों कसं म्हणतें !'—माझ्या बायकोला व्याकरण येत नाहीं साहेब ! 'अच्छा—तूं इतकी खात्री देतोस म्हणून मी हिला जाऊं देतों.'—पण साहेब त्या बोका–इ–बंगालला काय शिक्षा होईल ?—'तुला काय करायचंय !'—नाहीं, आपलं सहज विचारलं—'त्याला फांशीची शिक्षा होईलच ! पण फांशी देण्यापूर्वीं त्याला उकळत्या तेलांत टाकतील, नंतर शिशाच्या रसाची फोडणी त्याच्या डोक्यावर ओततील; आणि मग फांशी देऊन, त्याला विळीनें चिरून त्याचे तुकडे तुकडे करतील ! काय रे, तुझी बायको अशी कां थरथर कापते !'—नाहीं साहेब, तिला असले शिक्षेचे प्रकार ऐकण्याची संवय नाहीं—फार नाजुक आहे

माझी बायको—'बरं पण, तो दरवडेखोर भेटला तर आम्हांला कळव'—बरं साहेब—हं गेले, काढा आतां बुरखा !

**चंडिराम :** गेला ना तो यमाचा दूत ! नाहीं तर यायचा फिरून ! ( बुरखा काढतो. ) अहो, पण मी खरंच नाही बोका—इ—बंगाल ! कां हे लोक माझ्या मागं लागले आहेत !

**नागनाथ :** अहो, हीं कायद्याचीं कामं आहेत ! एकदां तुमच्यावर वहिम आला म्हणजे मग कोणी तुमच्या म्हणण्यावर विश्वास ठेवणार नाही ! आधीं तुम्हांला फांशी देतील आणि मग तुमचा पुरावा बघतील ! ( पावलें वाजतात. ) हा दुसरा पोलिस आला वाटतं ! बुरखा घ्या झटपट ! ( चंडिराम बुरखा घेतो. ) जरा बाजूला उभे रहा.

[ भुलेश्वर धांपा टाकीत येतो.

**भुलेश्वर :** अरे बापरे—पळतां पळतां अगदीं भुई थोडी झाली—नाहीं तर त्या पठाणानं आज माझा अगदीं प्राणच घेतला असता !

**नागनाथ :** कोण ? पंडितजी ! काय हो—अशा धांपा कां टाकतां ? झालं काय ?

**भुलेश्वर :** अहो, तो काकासाहेबांनीं नवीन ठेवलेला पठाण सुरा घेऊन माझ्या अंगावर धांवला ! म्हणाला, फिरून ह्या घरांत पाऊल टाकलंस तर तुकडे तुकडे करून टाकीन. जीव घेऊन पळालों म्हणून मरतां मरतां वांचलों !

**नागनाथ :** ( थोडा विचार करून ) पंडितजी, फिरून तुम्हांला त्या घरांत पाऊल टाकण्याचं कारणही पडणार नाहीं कदाचित ! ( स्वगत ) छान युक्ती सुचली !

**भुलेश्वर :** म्हणजे म्हणतां काय ?

**नागनाथ :** तुम्हांला माझा निरोप नाहीं पोहोंचला ?

**भुलेश्वर :** नाहीं बुवा !

**नागनाथ :** या किशानं कांहीं तरी घोंटाळा केला. मींच तुम्हांला इथं यावयाला सांगितलं होतं ! तुम्हांला नीरा पाहिजे ना ? तुम्ही इथं यायच्या आधींच मीं तिला इथं आणून ठेविली आहे. ती बघा !

**भुलेश्वर :** काय,: नीरा आहे ती ! काय म्हणतां ? नीरा—ए नीरा—

**नागनाथ :** गप, अगदीं ओरडूं नका ! ही गोष्ट इकडची इकडे कळतां कामां नये ! कुणाला कळूं नये म्हणून तर मीं तिला इथं बुरख्यांत आणली ! पंडितजी, तुम्हांला सांगायला मला आनंद वाटतो कीं, ती तुमच्याशीं लग्न करायला कबूल आहे !

**भुलेश्वर** : काय म्हणतां ? इतक्यांत सगळं ठरलं ! नागनाथ, तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस !

**नागनाथ** : तुमच्या दोघांच्या गुप्त लग्नाची मीं एका घरीं व्यवस्था केलेली आहे. तिथं चला. लग्न लागलं म्हणजे मग तिला घेऊन सरळ काकासाहेबांकडे जा आणि त्यांचे पाय धरा.

**भुलेश्वर** : अहो, पण तो पठाण आहे ना तिथं !

**नागनाथ** : त्याचा लावतों मी निकाल ! तुम्ही बेधडक जा तिथं !

**भुलेश्वर** : अहो, पण ते काकासाहेब–माईसाहेब काय म्हणतील ! आमचा दोघांचा जीव घेतील ना ते !

**नागनाथ** : एकदां लग्न लागलं म्हणजे कोणी कुणाचा जीव घेत नाहीं. डोळ्यांत पाणी आणा पुष्कळसं, क्षमा मागा दोघांची हुंदके देऊन ! म्हणजे येतील ते ताळ्यावर !

**भुलेश्वर** : नागनाथ, तुला डोक्यावर घेऊन नाचूं का काय करूं असं झालंय !

**नागनाथ** : जरा उभे रहा इथं. मी तिला बोलावतों. ( चंडिरामाजवळ जाऊन हलकेंच ) हें बघा, आमच्या गांवचे एक पंडित भुलेश्वर म्हणून अत्यंत सज्जन गृहस्थ आहेत. ते तुम्हांला जाफराबादला अगदीं सुरक्षित नेऊन पोहोंचवतील. अगदीं कांहीं काळजी करूं नका. माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवा. मात्र सोंग असं आणायचं ! कीं जसं कांहीं तुमचं त्यांच्याशीं लग्न ठरलं आहे. म्हणजे तुम्ही त्यांची बायको होणार आहांत. तुमचं नांव नीरा ! काय समजलांत ?

**चंडिराम** : माझं नांव नीरा !

**नागनाथ** : बायकोचं सोंग अगदीं फक्कड केलं पाहिजे !

**चंडिराम** : त्याची तुम्ही काळजी करूं नका ! लोकांचीच काय, पण खुद्द तुमच्या मित्राची देखील मी अगदीं बायको आहें अशीच समजूत होईल !

**नागनाथ** : लोकांच्या समजुतीसाठीं ते तुमच्याशीं कमीजास्ती शृंगार करतील !

**चंडिराम** : म्हणजे खोटाच ना–मग हरकत नाहीं !

**नागनाथ** : एखादे वेळीं खोटं लग्न देखील लावावं लागेल तुम्हांला त्यांच्याशीं ! मात्र प्राण गेला तरी आपलं खरं नांव सांगायचं नाही आणि तोंडावरचा बुरखा काढायचा नाहीं.

**चंडिराम** : पण मला जाफराबादला पोहोंचवतील ना ते खास ?

**नागनाथ** : त्याची नका काळजी करूं. चला, इकडे या. पंडितजी, ही घ्या तुमची नीरा—

**चांडिराम** : इश्श !

**भुलेश्वर** : अहाहा, नीरा—नीरा—तुला कधीं कडकडून भेटेन असं झालं आहे मला !

**चांडिराम** : हें काय असं भलतंच ! हे इथं उभे आहेत ना !

**नागनाथ** : बरं बुवा, मी होतों चार पावलं पुढं ! पंडितजी, तुम्ही तिचा हात धरून या माझ्या मागून !

[ नागनाथ जातो.

**भुलेश्वर** : लाडके, आजपर्यंत मी तुला इतका त्रास दिला त्याबद्दल तूं मला क्षमा केली आहेस ना !

**चांडिराम** : हें काय नाथ, असं बोलायचं तें ! नाहीं तर मी कशाला तुमच्याशीं लग्न लावायला तयार झालें असतें !

**भुलेश्वर** : नीरा, लाडके, तो बुरखा जरा बाजूला कर ना—बघूं दे मला तुझा चेहेरा—

**चांडिराम** : हें काय गडे असं इतक्यांत ? रस्त्यांतले चार लोक काय म्हणतील ! आतां थोडक्यासाठी कशाला ! मग पुढं आहोंतच आपण !

**भुलेश्वर** : अहाहा, किती गोड बोललीस ! नीरा, प्रेमानं डोकं फिरलेल्या आम्हां पुरुषांना धीरच रहात नाहीं कसला !—हं चल. अखेर शेवटीं होय नाहीं म्हणतां म्हणतां माझ्या भाग्याचा दिवस उगवला अं !

[ जातात.

## [ ३ ]

कचेश्वराचें घर. दोन भटजींनीं धाबळीचा अंतरपाट धरलेला आहे व बाजूला आणखी एक भटजी उभा राहिलेला असून तो मंगलाष्टकांच्या सुरावर पुढील श्लोक म्हणत आहे, असा पडदा उघडतो.

**भटजी** : शुभ लग्न सावधान !

डोळ्यांनीं बघतों, ध्वनी परिसतों
कानीं पदीं चालतों !
हातांनीं बहुसाळ काम करितों,
गोदावरी नर्मदा !

[ कचेश्वर नेत्राचा हात धरून ओढीत येतो. मागून मद्रासी वैद्याच्या पोषाखांतील अरविंद येतो.

**कचेश्वर** : थांबा, थांबा—नवरानवरी इकडे आणि मंगळाष्टकें कसलीं म्हणतां आहांत ! का त्या दोन भटांचंच लग्न लावताय ?

**भटजी** : (हंसून ) नाहीं मंगळाष्टकांची रंगीत तालीम चालली आहे !

**कचेश्वर** : हं नेत्रा, चला हो पुढं ! विनाकारण खोळंबा नको आतां ! घटका भरत आली !

**नेत्रा** : कोणाची माझी ? बाबा, तुम्ही जर माझ्यावर हा लग्नाचा जुलूम केलांत तर मी इथल्या इथं जीव देईन !

**अरविंद** : जीव नाड इंडू अम्मा, नमस्कार मरतुंडा !

**कचेश्वर** : जीव देशील ! खुशाल दे ! मेलीस तर या धन्वंतरींच्या संजीवनीनं पुन्हां तुला जिवंत करीन आणि यांच्याशींच लग्न लावीन ! हं, चला आटपा ! हें काय हो, हा धाबळीचा अंतरपाट कुठून आणलांत तुम्हीं ! हा किशा असा गाढव आहे ! याला माजघरांतल्या कपाटांतून शालजोडी आणायला सांगितली होती, तर त्यानं ही त्या स्वैपाकीणबाईची धाबळी आणलीन् ! मच्छरदाणी झाली आहे या धाबळीची ! असला अंतरपाट काय उपयोगाचा ?

**भटजी** : आतां असूं द्या ! नांवाला कांहीं तरी वस्त्र असलं म्हणजे झालं. नाहीं तरी नवरा मुलगा अंतरपाटाच्या वरून डोकावून बघतोच किनई !

[ किशा वाटी घेऊन येतो.

**किशा** : ह्या घ्या अक्षता !

**कचेश्वर** : गाढवा, या अक्षता का ? तुला तांदुळ आणायला सांगितले, तर हे वाटाणे घेऊन कशाला आलास ? लग्नांत वाटाण्याच्या अक्षता उधळायच्या असतात काय ?

**भटजी** : अहो, आतां उशीर होतो. तांदूळ काय न् वाटाणे काय ? नगाला नग असला म्हणजे झालं ! एकदां तर मीं नुसत्या रेवड्यावर लग्न लावलं आहे ! हांका मारा तुमच्या मंडळीला !

**कचेश्वर** : आमची मंडळी बसली आहे तिकडे आडावर जाऊन ! तिला जर हें ऐकूं गेलं तर जलसमाधि घेईल ! तुम्ही चला पलिकडच्या खोलींत ! आणि मंगळाष्टकं म्हणतांना जीव तोडून ओरडूं नका. मी इथं दाराबाहेर उभा

राहून पहारा करतों आणि दाराच्या फटींतून अक्षता टाकतों. चला, आटपा ! नेत्रा, हो आंत !

[ भटजी आंत जातात. नेत्राला कचेश्वर आंत ढकलतो.

तुम्हीं जा आंत धन्वतंरी ! बघतां काय !

**अरविंद** : ( स्वगत ) चंद्रमा पुढं गेल्यानंतर धन्वंतरी मागें कशाला रेंगाळेल ! ( उघड ) व्यंकटरमणा गोविंदा !

[ जातो. आंतून ' घेतों झोंप सुखें फिरून उठतों ही ईश्वराची दया ! कुर्यात् सदा मंगलम् ' असा आवाज ऐकूं येतो.

**कचेश्वर** : शुभ लग्न सावधान ! ( अक्षता उधळतो. ) अरे, वाजवा रे वाजवा !

[ विद्यागौरी व चित्रा प्रवेश करतात.

**विद्या** : वाजवा काय—शंख ! म्हणे वाजवा !

**कचेश्वर** : अरे, आलीस का तूं ? मग आतां ही सुपारी फेंकून द्यायला हरकत नाहीं ! ( कमरेची सुपारी फेंकून देतो. ) मला वाटलं, पोहोंचली असशील तूं विहिरीच्या तळाला आतांपर्यंत !

**विद्या** : तुमचं चाललंय नाटक इकडे आणि तिकडं त्या पोरटीचा काय प्रकार झाला ठाऊक आहे ? काय बेशरम कारटी आहे !

**कचेश्वर** : म्हणजे ! कोणासंबंधीं तूं हें बोलते आहेस ?

**विद्या** : नीरेसंबंधीं हो ! ती त्या पंडित भुलेश्वराबरोबर पळून गेली ! हें पहा तिनं काय पत्र लिहून ठेवलं आहे तें !

**कचेश्वर** : मग तुला रडायला काय झालं ! तुला तुझा आवडता जांवई मिळाली ना ! अरे किशा, ती घरांतील पंचारती घेऊन ये लवकर—

**विद्या** : ती कशाला ?

**कचेश्वर** : तुला ओंवाळायला ! दुसऱ्याचं ऐकायला नको ना तुला ! हजार वेळां सांगितलं मीं तुला, की तो पाजी पंडित आपल्या घरीं नको ! पण ऐकतो कोण ! आतां घ्या ? ( आंतून ' कुर्यात् सदा मंगलम् ' शब्द ऐकूं येतात. ) शुभ लग्न सावधान ! ( अक्षता दारावर फेंकतो ) झालं, लागलं देखील आमचं लग्न इकडे !

**विद्या** : लागलं ! आतां तुम्हीं एकदां आपल्या टाळक्यावर अक्षता उधळून घ्या म्हणजे झालं ! इकडे या पोरीचं लग्न आणि तिकडे त्या पोरीचं लग्न—चला, बघतां काय ? पळा—तिच्या शोधाला जा म्हणतें ना ?

**कचेश्वर** : बुजलेला बैल आणि पळून गेलेली पोरगी अडविण्याच्या भानगडींत पडूं नये कधीं ! पळत्या पोरीच्या पाठीमागं पळत जाऊन आपण आपले पाय कां दुखवा ? रस्त्यांत ठेंच लागून ती पडली म्हणजे येईल आपोआप रडत घरीं !

**विद्या** : तुमचं तर डोकंच फिरलं आहे ! देवा, काय रे हा दिवस दाखवलास !

[ अरविंद व नेत्रा प्रवेश करतात. त्यांच्या मागून हात झाडीत भटजी येतात.

**अरविंद** : भाळहळ्ळी आनंद चिंडा अय्या ! उपकारमाद्रि मारकुंडा ! ( विद्यागौरीस ) इष्टि इंडि अम्मा, नमस्कार बरतुंडा.

[ नमस्कार करूं लागतो.

**कचेश्वर** : अग, आशीर्वाद दे त्यांना ! बुरगुंडा होईल म्हणून !

**विद्या** : चल हो दूर ! मद्रासी म्हसोबा मेला ! आणखी नमस्कार करतोय वर !

**कचेश्वर** : अभाग्याच्या घरीं कामधेनु येऊन काय उपयोग ?

**विद्या** : या बैलाला कामधेनू म्हणायला माझे डोळे कांहीं फुटले नाहीत !

**कचेश्वर** : धन्वंतरी जांवई मिळाला—अमर होऊन टाकायचं आपलं, तें राह्यलं बाजूला—

**विद्या** : अमर होऊन असले हे प्रकार पहाण्यापेक्षां कायमचेच डोळे मिटलेले काय वाईट !

[ किशा ओरडत येतो.

**किशा** : अग बया ! भूत—भूत.

**कचेश्वर** : गाढवा, भूत—भूत काय ओरडतोस !

**किशा** : त्यें पघा !

[ पंडित भुलेश्वर व बुरखा घेतलेला चंडिराम प्रवेश करतो.

**कचेश्वर** : कोण, भुलेश्वर ? हरामखोरा, नीरेला घेऊन पळून गेलास काय ? आणि ही कोण ?

**विद्या** : पंडितजी, चांगले उपकार फेडलेंत ! कुठं आहे माझी नीरा ?

**भुलेश्वर** : काकासाहेब—माईसाहेब क्षमा करा—आम्हीं अपराधी आहोंत—नीरा, पड काकासाहेबांच्या पायां—आणि त्यांची करुणा भाक. तोंपर्यंत मी माझ्या डोळ्यांत पाणी आणण्याचा प्रयत्न करतों.

**विद्या** : कोण नीरा ?

**कचेश्वर** : काय नीरा आहे ही ? अग कारटे.

**भुलेश्वर** : होय, काकासाहेब, हीच आपली नीरा ! भयानं व लाजेनं तिची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली आहे.

**कचेश्वर** : आपल्या बेशरमपणावर पांघरूण घालण्यासाठीं हा बुरखा घेतला आहे तर—

**भुलेश्वर** : काकासाहेब, आतां मेलेल्याला नका मारूं ! आम्ही आपल्या परवानगीवांचून विवाहबद्ध झालों—

**विद्या** : काय, लग्न देखील लावून टाकलंत इतक्यांत ?

**भुलेश्वर** : होय माईसाहेब ! आमच्या हातून घोर अपराध झाला–( डोळे पुशीत ) आतां तारा मारा–काय वाटेल तें करा—

**कचेश्वर** : तुझ्या असल्या सोंगानं मी फसणार नाहीं. थांब, तुला पोलिसच्याच ताब्यांत देतों. अरे मास्तरड्या, चांगल्या मुलींच्या शिकवण्या करतोस !

**भुलेश्वर** : काकासाहेब, फिरून अशी चूक होणार नाहीं !

**कचेश्वर** : गद्ध्या, जन्मभर टिकणारी चूक केलीस आणि फिरून चूक करणार नाहीं म्हणून काय म्हणतोस ? म्हणजे फिरून या पोरीशीं लग्न करणार नाही असं म्हणतोस कीं काय ? किशा, पळ जा पोलिसाला बोलावून आण—

**चंडिराम** : अगबाई–पोलीस—

[ थरथर कांपू लागतो.

**भुलेश्वर** : नीरा, लाडके घाबरूं नकोस ! तुझ्यासाठी मला वाटेल ती शिक्षा झाली तरी मी पत्करीन !

**विद्या** : थांबा, पंडितजी ! नीरा, अशी घाबरूं नकोस—ये अशी. थरकांप उडून गेला बिचारीचा ! ( कचेश्वरास ) लाज नाहीं वाटत तुम्हांला असं बोलायला ! मारून का टाकायचं आहे तिला ! झाली लहान मुलांच्या हातून चूक तर रागवायला काय झालं ! पंडितजी, तुम्ही निर्धास्त असा ! नीरा, बाई उगा, रडूं नकोस ! कांहीं वाईट झालं नाहीं ! देव करतो तें सारं बऱ्याकरतांच करतो !

**भुलेश्वर** : माईसाहेब, तुमचा आधार असल्यावर आम्हांला कोणाचं भय आहे ?

**कचेश्वर** : हिच्या फुसलावणीनं असा उन्मत्त होऊं नकोस ! हरामखोर, माझ्या पोरीच्या आयुष्याचं वाटोळं केलंस ! थांब—

**विद्या** : आणि तुम्ही तरी त्या पोरीच्या आयुष्याचा काय मोठा चौकोन केला आहे ? कुठला तेलंगणांतला कोण तेली आला आणि त्याच्या पदरांत आपली खुशाल डोळे मिटून पोरगी टाकलींत—

**कचेश्वर :** तुला ह्यांची किंमत काय कळायची आहे ! अश्विनीकुमाराचा बाप आहे हा—

**विद्या :** तो अश्विनीकुमाराचा बाप असेल तर आमचे हे पंडितजी बृहस्पतीचे आजोबा आहेत—

**कचेश्वर :** सबंध दक्षिण हिंदुस्थानांत यांच्याएवढा न्हावगंडु अय्या कोणी नाहीं !

**विद्या :** पुरें झालं ! गांवढ्या गांवांत गाढवी सवाशीण ! नीरा, बाई, काढ आतां डोक्यावरचा बुरखा, भिऊं नकोस—

**चंडिराम :** मला किनई भारी लाज वाटते !

**भुलेश्वर :** हं, आतां पुरें झालं लाजणं ! लग्न झाल्यावर पुरुष निर्लज्ज होतात आणि बायकांना कुठून लाज येते एवढी !

**विद्या :** केवढी मोठी दिसूं लागली आहे आमची नीरा ! आज माझ्या लक्षांत आलं !

**भुलेश्वर :** बोलूनचालून या उफाड्याच्या पोरी ! मिनिटामिनिटाला वाढतात. काढतेस कीं नाहीं तो बुरखा ! का मी काढूं ?

**चंडिराम :** नका, नका, मी तुमच्या पायां पडतें—बुरखा काढूं नका !

[ पठाणाच्या पोषाखांतला निरंजन नीरेला ओढीत येतो.

**नीरा :** सोड, सोड, मेल्या माझा हात ! मीं पंडितजीबरोबर गेलें तर तुझ्या बापाचं काय गेलं ?

**निरंजन :** असीरे हिर्स नूरेवतन खूने नाहक ! पीछे चलो एकदम !

**विद्या :** कोण नीरा ? अगबाई ! आणखी मग ही कोण ?

**कचेश्वर :** ही तर नीरा ! आणि मग हें कोण—नीरेचं भूत ?

**निरंजन :** कौन नीरा ! नीरा ओ है ! ओ बदमाष पंडितजीके साथ जाती थी मैने पकडके लायी ! बाबर–हुमायून–अकबर–शहाजहान—

**कचेश्वर :** झूट बोलते तुम ! पंडितजी तर इथं आहेत आणि ही कोणाबरोबर पळून चालली होती ?

**निरंजन :** तोबा तोबा ! पंडितजी इधरही है ! मैने तो उदरबी देखा ! अबी इधर कैसा आया ! सैतान का बच्चा ! कालीमूरकालीफासफेरमफास ! तुमारी हड्डी फोडुंगा, खिमा करूंगा ! इधर फिर कायकू आया !

[ अंगावर धांवून जातो.

**भुलेश्वर :** मेलों–मेलों, काकासाहेब ! याला अडवा !

**विद्या** : होतोस का नाहीं मेल्या मागं ! आडदांड राक्षस कुठला !

**कचेश्वर** : काय हो पंडित, काय भानगड केली आहेत ही ! ही कोण बिल्लीजान लग्न लावून इथं आणली आहेत !

**भुलेश्वर** : तुमच्या गळ्याशपथ सांगतों कीं ही नीरा आहे !

**कचेश्वर** : ही नीरा, तर ( नीरेकडे बोट दाखवून ) मग ही तुमची आई कोण भीमा आहे काय ?

**भुलेश्वर** : तेंही खरंच आहे ! ( चंडिरामास ) काय ग, तुझं नांव काय आहे ?

**चंडिराम** : माझं नांव किनई नीरा आहे.

**भुलेश्वर** : पहा, ही नीरा आणि ती ही नीराच !

**कचेश्वर** : काय नीरा ? चमत्कार आहे !

**निरंजन** : ( स्वगत ) अरेच्या, ही कोण तोतया नीरा निर्माण झाली ?

**भुलेश्वर** : एका नीरेशीं तर मीं लग्न केलंच आहे. आतां या नीरेशीं जरी मला लग्न करावं लागलं तरी माझी तयारी आहे !

**कचेश्वर** : तर–तर–मोठा स्वार्थत्यागच करतां कीं नाहीं ! थांबा, हें कोडं असं नाहीं उलगडायचं ! हे गोषांतील सुंदर स्त्रिये, आतां मेहेरबानी करून तुझा हा बुरखा दूर कर. तुझ्या दर्शनासाठीं आमचा जीव अगदीं चालला आहे इथं !

**चंडिराम** : बायामाणसाशी असा फाजिलपणा करणं बरं नाहीं.

**विद्या** : छान झालं ! बरं नाक ठेचलं !

**कचेश्वर** : हें प्रकरण असं ताळ्यावर यायचं नाहीं ! पठाण, चलो, निकालो, उसका बुरखा ! अबीके अबी !

**निरंजन** : ऐसा ? अच्छा ! ए गोहरजान मलकाजान बिल्लीजान ! क्युं शर्माते हो, मेरि जान, बुरखा सरका दो, बुरखा सरका दो. अपने रुए रोशनसे, मेरिजान !

**चंडिराम** : खबरदार, माझ्या अंगाला हात लावशील तर ! ( निरंजन तिचे अंगावरचा बुरखा ओढतो. ) मेलों–मेलों–धांवा—

**निरंजन** : चलो, निकालो बुरखा ! अहमदाबादहैद्राबादझिंदाबाद !

[ एकदम बुरखा काढतो. चंडिराम प्रकट होतो.

**भुलेश्वर** : अरे बापरे, हा कोण ?

**कचेश्वर** : हाच तो बोका–इ–बंगाल ! भला सांपडला ! पठाण, पकडो उसकू ! किशा धांव, पोलिसला बोलावून आण ! आतां एक लाख रुपयांचं बक्षीस मिळणार ! नक्की !

**चित्रा** : इश्श ! याच्या का पाठीवरून मी इतका वेळ हात फिरवीत होतें ! अरे, मेल्या, चांगला सांपडलास ! बायकांचे खून करून पुन्हां बायकोचं सोंग घेऊन पळून जात होतास काय !

**भुलेश्वर** : हरे राम, आणि याच्याशीं माझं लग्न झालं ! अरे हरामखोरा, असं मला फसवतोस काय ? काकासाहेब, थांबा मीच याला पोलिसच्या ताब्यांत देतों !

**कचेश्वर** : तुम्ही नका या भानगडींत पडूं ! उलट पुरुषाशीं लग्न केल्याच्या भयंकर गुन्ह्याबद्दल पोलिस तुम्हांलाच पकडतील आणि तुरुंगांत घालतील !

**चंडिराम** : काकासाहेब, मी तुमच्या पायां पडतों—अहो, मी बोका-इ-बंगाल नाहीं—दरवडेखोर नाहीं—कुणाचा खून केला नाहीं ! मी तुम्हांला अगदीं जीव तोडून सांगतों ! मला सोडून द्या—

[ फौजदाराचे पोषाखांत नागनाथ व शिपाई प्रवेश करतात.

**नागनाथ** : तुला सोडून द्या ! बदमाष, इतके दिवस वारंट चुकवतां चुकवतां आज सांपडलास !

**कचेश्वर** : फौजदारसाहेब, मीं त्याला पकडला आहे ! लाख रुपयांचं बक्षिस मला मिळालं पाहिजे !

**नागनाथ** : तें सरकार ठरवील ! शिपाई, घाल त्याला हातकड्या !

**चंडिराम** : फौजदारसाहेब, मी तुमच्या पायां पडतों. मला क्षमा करा, मला जीवदान द्या. अहो, परवां तुम्हीं मला दया करून सोडून दिलंत, आतां कां गळा कापतां ? आणखीन् काय वाटेल तें लिहून देतों. पण मला सोडून द्या. आजपर्यंत तुम्हीं आपल्या धंद्यांत एवढी पापं केलीं असतील; आतां माझ्याकरतां एवढं तरी पुण्य करा !

**नागनाथ** : तूं इतका गयावया करतो आहेस म्हणून मी तुझ्यावर दया करतों. पण असं नाहीं तसं तुला मी चतुर्भुज केल्याशिवाय सोडणार नाहीं. हें बघ, मी सांगतों त्या मुलीशीं लग्न करशील तरच तुला सोडून देईन.

**चंडिराम** : एवढंच ? अहो, लग्न करायला एवढा धाकदपटशा कशाला ? एकच काय पण तुम्ही सांगाल तर दहा मुलींशीं मी डोळे झांकून लग्न करीन. तेवढ्यासाठीं तर मी या गांवीं आलों आहें !

**नागनाथ** : कचेश्वर, तुमची चित्रा नांवाची जी पुतणी आहे ती हीच ना ? चित्रा, इकडे ये पाहूं !

**कचेश्वर** : म्हणजे तुमचा विचार काय आहे ?

**नागनाथ :** तुम्हीं बोलूं नका मधें. चित्रा, चल, पुढें ये इकडे !

**चित्रा :** इश्श, मला बाई लाज वाटते !

**नागनाथ :** ए बदमाष, हिच्याशीं तुला लग्न करायला पाहिजे ! आहे कबूल !

**चंडिराम :** कबूल नसायला काय झालं ! कांहीं वाईट नाहीं ही ! पण ही बायकोच आहे ना ! का कांहीं सोंग आहे !

**भुलेश्वर :** नाहीं—ती तुम्हीं आधीं खात्री करून घ्या ! नाहीं तर आमच्यासारखी पुरुषांशीं लग्न करायची पाळी यायची !

**विद्या :** काय हो फौजदारसाहेब, तुम्ही इथं गुन्ह्याचा तपास करायला आलांत का लग्न लावायला आलांत ! आमची चित्रा वेडसर असली तरी या दरवडे-खोराला मी देऊं देणार नाही !

**कचेश्वर :** ( विद्यागौरीस ) अग ए, गप बस की ! आपली पोरगी चांगली खपते आहे, उगाच का ओरडा करतेस ? नाहीं तरी हा वेडा गोळा पदरांत घ्यायला कोणचा हरीचा लाल येणार आहे ? बक्षिसाचे लाख रुपये बुडाले तरी हें काम मात्र लाखाचं होतं आहे ?

**विद्या :** काडीची अक्कल नाहीं तुम्हांला !

**नागनाथ :** अहो बाईसाहेब, कायद्याच्या कामांत असा अडथळा कराल तर तुम्हांला जबर शिक्षा करावी लागेल ! एक काम तर झालं ! आतां कचेश्वर, दुसरं काम तुम्हीं करा. घरांतून पळून जाणाऱ्या तुमच्या या मुलीला घरांत परत सुरक्षित आणून दिल्याबद्दल तुम्हीं आपली नीरा या पठाणाला देऊन टाका !

**कचेश्वर :** काय, म्हणतां काय ? वेड लागलंय काय तुम्हांला ? फौजदारसाहेब, आतां तुम्हीं केलंय एवढं पुरे करा ! आतां जास्त अतिप्रसंग कराल तर तुम्हांलाच पोलिसच्या ताब्यांत देण्याची पाळी येईल !

**नागनाथ :** कचेश्वर, तुम्ही जर माझं म्हणणं ऐकणार नाहीं तर मला तुमच्यावर हें वारंट बजवावं लागेल !

**कचेश्वर :** माझ्यावर वारंट ! माझ्यावर कसलं वारंट ?

**नागनाथ :** या दरवडेखोराला आपल्या घरांत आजपर्यंत आश्रय दिला त्याबद्दल हें वारंट सरकारनं काढलं आहे तुमच्यावर !

**कचेश्वर :** खोटी गोष्ट आहे ही !

**नागनाथ :** त्याबद्दल आमच्याजवळ भरपूर पुरावा आहे ! पांच वर्षांची सक्त-मजुरीची शिक्षा मिळेल तुम्हांला या गुन्ह्याबद्दल !

**कचेश्वर** : अरे बापरे !

**नागनाथ** : बोला, तुम्हांला हा पठाण जांवई पाहिजे का पांच वर्षांची सक्त मजुरी पाहिजे !

**विद्या** : पठाणाला मुलगी देण्यापेक्षां पांच वर्षांची सक्तमजुरी पत्करली !

**कचेश्वर** : तर—तर—तुरुंगांत खडी फोडावी लागेल मला ! तुला का बोलायला होतंय ! पण काय ग नीरा, तुला पसंत आहे का हें !

**नीरा** : हो, बाबा, मला हें सारं मान्य आहे !

**विद्या** : काय बेशरम कार्टी आहे !

**भुलेश्वर** : माझ्यासारखा विद्वान् हिंदु पंडित टाकून देऊन ही पोरगी य पठाणाबरोबर लग्न करायला तयार झाली; म्हणजे आतां काळच फिरला, नाहीं तर काय म्हणायचं ?

**कचेश्वर** : आणि पठाण, तुमकू तरी ये कबूल है ना !

**निरंजन** : हा हा—मालिक, कबूल है ! ( नीरास ) आव ग मेरी कुलपी मलाई—

**नीरा** : जी, मेरे गुलाबजंबू !

**कचेश्वर** : छान ! मिया–बिबी राजी तर काय करील काजी ?

**भुलेश्वर** : फौजदारसाहेब, अहो, याला निदान हिंदु तरी करून घ्या. नाहीं त लोक आम्हांला या गांवांत राहून द्यायचे नाहींत !

**नागनाथ** : तें करतां येईल. अहो भटजी, या पठाणाला हिंदु करून हीं दो लग्नं आतांचे आतां करून टाका ! आहे ना सगळं साहित्य जवळ ?

**भटजी** : हो हो—येतांना चांगलं दोन शेर गोमूत्र आणि शेण घेऊन आलं आहे ! सगळं अफगाणिस्तान आणि अरबस्तान शुद्ध करण्याइतकं शेण आहे माझ्याजवळ ! चला मंडळी आंत !

**चंडिराम** : म्हटलं आमचा तो पाळणा आणि दुधाची बाटली फुकट जाते कीं काय ? पण नाहीं !

**चित्रा** : इश्श ! मला बाई लाज वाटते !

[ चंडिराम, चित्रा, निरंजन व नीरा आंत जातात.

**कचेश्वर** : फौजदारसाहेब, आतां नाहीं ना तें वारंट बजावणार माझ्यावर ?

**नागनाथ** : त्याबद्दल तुम्ही निर्धास्त असा !

**विद्या** : एकंदरींत खूप जांवई मिळाले आम्हांला ! एक मद्रासी राक्षस, दुसर

पठाण आणि तिसरा दरवडेखोर! आतां जांवयांचं प्रदर्शन भरवायला कांहीं हरकत नाहीं!

**भुलेश्वर :** माझं त्या दरवडेखोराशीं लग्न लागलं हा विचार मनांत आला म्हणजे सर्वांगाचा थरकांप होतो! बरं झालं, मी त्याच्याशीं फारसा शृंगार केला नाहीं!

**नागनाथ :** काकासाहेब, आतां एकच विनंति आहे—

**कचेश्वर :** काय विनंति! फौजदारसाहेब, आतां आणखी कोणाचं लग्न लावतां आहांत? आतां ह्या पंडितजीचं काय तें लग्न उरलं आहे!

**भुलेश्वर :** मी जन्मांत लग्न लावणं शक्य नाहीं! आतां जी अद्दल घडली, त्यामुळं मला लग्नाची अगदीं शिसारी आली आहे!

**कचेश्वर :** आमच्या घरांत आतां मुलीहि कोणी उरल्या नाहींत शिकवायला! पंडितजी, तुम्ही आतां मास्तरकीचा धंदा द्या सोडून—त्यापेक्षां एखादं गवळ्याचं दुकान काढा!

**विद्या :** एवढे मोठे पंडित पदवी मिळविलेले हे विद्वान आणि त्यांना तुम्ही गवळ्याचं दुकान उघडायला सांगतां? खूप शहाणे आहांत! मग तुम्ही जळाऊ लांकडांची वखार कां उघडत नाहीं?

**भुलेश्वर :** नाहीं, काकासाहेब म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं! मीं कांहीं पदवीनं पंडित नाहीं! माझं आडनांव पंडित आहे!

[ आंतून ‘ शुभ लग्न सावधान ’ असा आवाज ऐकूं येतो.

लागलीं लग्नं वाटतं! आतां निदान टाळ्या तरी वाजवा!

**नागनाथ :** बस! झालं काम! काकासाहेब, विनंति ती हीच कीं—

[ एकदम कचेश्वराचे पाय धरतो.

**कचेश्वर :** उठा. उठा, फौजदारसाहेब, अहो, हें काय? तुम्ही कां माझ्या पायां पडतां—

**नागनाथ :** मला अभयदान दिल्याशिवाय मी उठणार नाहीं!

**कचेश्वर :** तुम्हीच आम्हांला अभयदान देणार! दुसऱ्याचे पाय धरणारा हा पहिलाच पोलिस पाहिला मीं आज! उठा, तुम्हांला अभयदान आहे! फौजदारसाहेब—

**नागनाथ :** ( एकदम दाढी काढून ) फौजदारसाहेब नाहीं—नागनाथ! आतां मात्र याला पोलीसच्या ताब्यांत देऊं नका!

**कचेश्वर**<br>**विद्या** } : कोण नागनाथ !

**भुलेश्वर :** अहो, यानंच माझं त्या दरवडेखोरांशीं लग्न लावलं !

**कचेश्वर :** नागनाथ, पोलिसाचं सोंग घेऊन मला असं फसवतोस काय ? पाजी माणसा, थांब आतां तुझा असा निकाल लावतों—

**नागनाथ :** अहो, पण तुम्हीं मला अभयदान दिलं आहे ना आतां !

**कचेश्वर :** अभयदान गेलं खड्यांत ! स्वतःचीं वचनं पाळायला हें कांहीं सत्ययुग नाही ! तें कांहीं नाहीं ! माझ्याशीं असला हलकटपणा केल्याबद्दल तुझ्या चिंधड्या करून टाकतों.

**नागनाथ :** थांबा, तसं करण्यापूर्वी मी तुमच्या सगळया जांवयांची एकदां नीट ओळख तरी करून देतों. अहो नहावगंड्‌ अय्या, या पुढं. हे तुमचे नंबर वन्‌चे जांवई–अरविंद.

[ अरविंद खोट्या मिशा काढून टाकतो.

**कचेश्वर :** कोण अरविंद ! म्हणजे हा धन्वंतरी नव्हे तर !

**अरविंद :** नाळगुंडा धन्वंतरी मिंडा ! अय्या !

**कचेश्वर :** मग मला यानं अमर कसचं केलंन डोसक्याचं ! पण तसं म्हणावं तर माझा रोग बीग तर पार नाहींसा झाला ! काय रे ए, मला पाजलंस तरी काय त्या बाटलीमधें ?

**अरविंद :** गोमूत्र !

**कचेश्वर :** ( ओरडून ) काय गोमूत्र !

**भुलेश्वर :** पण गाईचंच होतं ना तें !

**अरविंद :** काकासाहेब, तुम्हांला कांहीं झालं नव्हतं ! नुसता कल्पनेचा रोग झाला होता तुम्हांला ! म्हणून तो त्याच मार्गानं आम्हांला दूर करावा लागला !

जगीं या दिसत जो सारा,<br>
पसारा कल्पनेचा हा !<br>
मनाची मृगजळी माया,<br>
मनाला घालिते मोहीं !